प्रकाशमाला पुष्पे ७ वें—

# रस्ते आणि फिरस्ते.

लेखक

रा. ग. कुंभोजकर, एम. ए. बी. टी.

२० एप्रील ] किंमत सव्वा रुपया [ १९४०

छापत आहे !  छापत आहे ! !

प्रकाशमाला पुष्प ९ वें —

# —निळा पक्षी—

अनुवादकः—साने गुरुजी, एम्. ए.

—युरोपातील विख्यात कादंबरीकार मॅटर्लिंक यांच्या Bleu Bird या सुंदर पुस्तकाचा हा अनुवाद आहे. मुलांच्या मनाचे येथें मनोवेधक आविष्करण केलें आहे.

—साने गुरुजींच्या रसवंती भाषेमुळें पुस्तक फारच गोड झाले आहे.



# अंगुली-निर्देश.

माझा " कल्पना–विलास " नामक कथासंग्रह पुढें येतो न येतो तोंच हा दुसरा लेखसंग्रह पुढे येत आहे. अर्थात् याचें बरेचसे श्रेय माझे प्रकाशक मित्रवर्य रामभाऊ भोगे यांच्याकडेच आहे.

" कल्पना विलास " ला प्रस्तावना लिहितांना प्राध्यापक श्री. रा. पारसनीस यांनी " Light Literature हा वाङ्मय प्रकार " माझ्या " प्रतिभेला मानवत असल्याचें म्हटलें होतें. माझ्या प्रतिभेचा हा जर एक विशेष असेल तर त्यास लघुकथेइतकेच लघुनिबंधांतहि क्षेत्र आहे. या दृष्टीनें माझ्या कथा–संग्रहा बरोबर माझा लघुनिबंध संग्रहहि प्रसिद्ध होत आहे हें एका अर्थी बरेंच होत आहे.

गेल्या सात वर्षांत किर्लोस्कर, मनोहर, यशवंत कला, आदिकरून नियतकालिकांत माझे जे लघुनिबंध प्रसिद्ध झालेले आहेत त्यातील कांहीं निवडक लघुनिबंध प्रस्तुत संग्रहांत समाविष्ट केलेले आहेत. लघुनिबंधांच्या जोडीला ज्या लघुकथांची निवड करण्यांत आलेली आहे त्यांची प्रकृतीहि लघुनिबंधाच्या प्रकृतीला जुळेल अशीच आहे.

या लेखांच्या पुनर्मुद्रणास परवानगी दिल्याबद्दल संपादकांचा, पुस्तकाला साजेलसें सुंदर चित्र काढून दिल्याबद्दल मित्रवर्य विसूभाऊ गोळिवडेकर यांचा आणि प्रकाशनाच्या कामीं प्रोत्साहन देणाऱ्या अनेक इतर मित्रांचा मी अत्यंत आभारी आहें.

रामनवमी<br>दिनांक १६-४-४०<br>सातारा.

रा. ग. कुंभोजकर.

# अनुक्रमणिका.

रम्ने आणि क्रिम्ने

## रस्ते आणि फिरस्ते :- १०

स्वराज्य हा प्रत्येक हिंदी मनुष्याचा जन्मसिद्ध हक्क आहे. आणि हा हक्क मिळवून देण्यासाठीं कॉंग्रेस प्रयत्न करीत आहे.

असं असूनसुद्धां कॉंग्रेसबद्दल आणि कॉंग्रेस कार्याबद्दल नाक मुरडणारे लोक आहेतच.

कां बरं असं असावं ?

या प्रश्नाचं उत्तर प्रत्येकजण निरनिराळं देईल.

माझं उत्तर असं आहे कीं, कॉंग्रेसच्या कार्याबद्दल लोक नाक मुरडतात, कारण—कारण आमचे रस्ते !

माझं उत्तर वाचून हसूं येईल तुम्हाला.

पण हंसण्यावारी नेण्यासारखी नाहीं ही गोष्ट--

कां तें पहा—निदान रस्त्यापुरतं तरी स्वराज्य आम्हांला मिळालेलं आहे. आम्ही निवडलेलीं माणसंच म्युनिसिपल कमिट्यांतून आणि लोकलबोर्डांतून बसतात, रस्त्यांची देखरेख करतात. पण रस्त्यावरच्या या स्वराज्यानं आमची कोणती सोय पाहिली आहे ? आम्ही हवा खायला म्हणून बाहेर पडतो

अन् धूळ खाऊन परत येतों. तेव्हां आमच्यासारख्या सामान्य माणसांना वाटतं रस्त्यावरचं स्वराज्य मिळालं तर धूळ खाण्याचा प्रसंग आला, संपूर्ण स्वराज्य झालं, तर धूळदाण व्हायची एकाद्या वेळेस! तेव्हां तें स्वराज्य नको अन् तें स्वराज्य मिळवून देणारी कॉंग्रेसहि नको!

—बाकी कोणत्याहि प्रश्नाला दोन बाजू असायच्याच. आता दाखविली ही झाली वाईट बाजू. चांगली बाजूहि कशी काय आहे तें आपण पाहूं.

१ आपण फिरायला जातों. जवळून एखादी मोटार जाते. ती मोटार जातांच धुळीचे प्रचंड लोट अंतराळांत उडून दशदिशा व्यापून टाकतात, आणि आपण पृथ्वीच्या पाठीवरून चालत नसून अंतराळांत धूसर ढगांतून चालत असल्याचा आपल्याला अनुभव येतो. विमानाशिवाय अंतराळांत फिरवून आणणारे हे रस्ते असेच निरंतर राहूं देत, अशी आम्हां फिरस्त्यांची त्या दयाघन प्रभूला [अल्ला तर] प्रार्थना आहे. हा झाला एक महत्वाचा फायदा. याशिवाय या रस्त्यांपासून आणखी कितीतरी महत्वाचे फायदे होतात.

२ रस्त्यानें मोटारी गेल्यामुळें जी धूळ उडते, तिच्यायोगें पादचारी लोक मोटारींना आणि त्या मोटारींच्या मालकांना शिव्या देऊं लागतात. या शिव्यांच्या योगानें वर्गकलह वाढून साम्यवादाच्या प्रसाराला अतिशय मदत होते.

३ पावसाळ्यांत रस्त्यावरील धुळीचें चिखलांत रूपांतर झाल्यामुळें रस्त्यानें कसलेंहि वाहन गेलें तरी चिखलाचा प्रसाद बाजूनें चालणाऱ्या माणसाला मिळतोच. त्यायोगें भपकेबाज कपडे खराब होतात, म्हणून लोक साधे कपडे वापरतात. लोकांना साध्या रहाणीबद्दल प्रेम वाटूं लागतें. साधी रहाणी म्हटलें कीं उच्च विचारसरणी आलीच. चिखलांनीं भरलेल्या रस्त्यामुळें लोकांची विचारसरणी उच्च होते व त्यामुळें शाळाकॉलेजें चालू ठेवण्यांत व नवीन स्थापन करण्यांत, देशाचा पैसा खर्च करण्याचे कांहींच कारण उरत नाहीं.

४ गव्हर्नर किंवा व्हाईसरॉय यांसारखे बडे अधिकारी यावयाचे असतील, तर रस्त्यावर मुरुमाचें किंवा मातीचें एक पातळ अस्तर टाकण्यांत येतें. या अस्तराखालचा मूळचा रस्ता ओबडधोबड असाच असतो. या अस्तराच्यायोगें प्रगट होणारा आदरहि या अस्तरासारखा क्षणभंगुर आणि तकलुपी असावा, ही गोष्ट त्या बड्या अधिकाऱ्यांच्या सहज लक्षांत येऊन ते कदाचित् वैतागून परत इंग्लंडला जातील आणि आपल्याला आयतेंच स्वराज्य मिळेल.

५ या रस्त्यांनीं चालतांना पुष्कळच चढ--उतार करावे लागतात. त्यामुळें सामान्य लोकांची शरीरप्रकृति निकोप रहाते. वहानांतून प्रवास करतांना त्यांचें अंग आयतेंच रगडलें गेल्यामुळें निराळें मालिश करण्याची दगदग करावी

लागत नाहीं.

६ पावसाळ्यांत रस्त्यावर चिखल झाल्यानें पुष्कळदां पाय घसरून गटारांत पडायला होतें. यायोगें लोकांना नीतींचे प्रत्यक्ष पाठ मिळण्याचा पुष्कळ संभव आहे.

अशा प्रकारचे बहुगुणी पण अल्पमोली आणि फायदे-शीर रस्ते उखडून त्यांच्या जागीं डांबरी रस्ते करण्याचा उपक्रम कांहीं शहरांतून करण्यांत आलेला आहे, ही अत्यंत वाईट गोष्ट आहे. आमचे जुने रस्ते हे आमच्या जुन्या संस्कृती-इतकेच आम्हांला प्रिय असल्यानें त्यांचें शुद्धीकरण उर्फ डांबरीकरण आम्हांला कदापि सहन होणार नाहीं.



## अकमानिता :– २

—१—

शाळेंतील वार्षिक सम्मेलनाचे दिवस होते ते. सम्मेलनांत करावयाच्या नाटकाची आमूलाग्र व्यवस्था आम्हा तीनचार शिक्षकांच्या समितीकडे सोंपविलेली होती, आणि त्यासंबंधीं विचार करण्याकरितां त्या रात्रीं आम्हीं एकत्र जमलों होतों. दिवस चांदण्याचे होते आणि चांदणें कसें शुभ्र पिठासारखें पडलें होतें. आम्ही चादण्यांत बसलों होतों थोड्या वेळांत आम्हीं आमचे काम विसरून गेलों आणि गप्पांत रंगून गेलों. गोष्टीवरून गोष्ट निघतां आपल्या आयुष्यांत खरोखरच एकदां "संशयकल्लोळ" नाटक कसें घडून आलें याची मजेदार हकीगत विनायकराव मास्तरांनीं सांगण्यास सुरवात केली. ते म्हणाले—

'दादरला मी एक शिकवणी घेतलेली होती. तीसाठीं रोज संध्याकाळीं सातला दादरला जावें लागे. आठाला शिकवणी आटोपल्यावर श्रमपरिहारार्थ मी सरळ तांब्यांच्या 'आरोग्यभुवना'ची वाट धरीत असे. आणि तेथें श्रमपरिहार

करून—खरें सांगायचें म्हणजे पोटांत कांहींतरी भरून मी येत असे आणि तिथून मग माझ्या रहाण्याच्या ठिकाणीं स्टेशनवर म्हणजे सान्ताक्रूझला जात असे.

'माझ्या आयुष्यांतल्या एका चमत्कारिक प्रसंगाची हकीगत मी आतां सांगणार आहे. आणि या हकीकतींत 'रोमान्स'ला महत्त्व नाहीं हें पटवून देण्यासाठीं सुरवातीलाच सांगून मोकळा होतों कीं, माझें लग्न झालें होतें, आणि तेंहि कसें म्हणाल, तर अगदी सनातनी पद्धतीनें.

'प्रीतीविवाहाचे विचार माझ्या डोक्यांत नव्हते असें नाहीं. किंबहुना ज्युनिअर बी. ए. च्या वर्गांत असतांना विवाह करावयाचा तर तो प्रीतीविवाह करायचा आणि तोहि कुणाशीं करावयाचा हें मीं निश्चित करून टाकलें होतें.

'पण बी. ए. झाल्यावर ज्या वेळीं मी नोकरीसाठी प्रयत्न करूं लागलों आणि ती तर मला मिळेना, तेव्हां वैतागून मी माझ्या काहीं विचारांना आणि संवयींना रजा दिली. 'रिट्रेंचमेंट'च्या या धुमधडाक्यांतच माझ्या प्रीतीविवाहाच्या विचाराला कायमची रजा मिळाली होती.

'मौज अशी कीं, या गोष्टीबद्दल पश्चाताप करावयाची पाळी मला पुढें केव्हांच आली नाहीं. माझ्या धर्मपत्नीच्या—सरलेच्या सहवासांत मी एवढा सुखी होतों कीं, प्रीतिविवाहाच्या मृगजळामागें धांवत जाऊन भलतेंच एखादें रत्न गळ्यांत बांधून घेण्याच्या भरीस पडलों नाहीं याबद्दल मला समाधान वाटे.

—२—

' एके दिवशीं मी असाच दादरला शिकवणीसाठीं गेलों होतों. शिकवणी आटोपल्यानंतर माझ्या ठराविक कार्य-क्रमाप्रमाणें मी ताम्ब्यांच्या आरोग्य--भुवनात उपस्थित झालों.

' एका फळ्यावर ताज्या पदार्थांची यादी दिसत होती. तींत ' डोशा ' हें नांव विशेष प्रामुख्यानें दिसत होतें. यापूर्वी मी त्या उपहारगृहांत कितीतरी वेळां आलों असेन, पण तेथील ' डोशा'ची लज्जत मी कांहीं चाखली नव्हती. उडपी लोकांच्या दुकानातून जशा प्रकारचा डोशा मिळतो तशाच प्रकारचा हाहि डोशा असेल असें समजून मीं एका 'डोशा'ची मागणी केली. आणि त्यानंतर माझ्यापुढें जो पदार्थ येऊन बसला तो पहातांच माझी समजूत साफ चुकली हें मला उमजलें.

' खाण्यावरून मनुष्याचं लक्ष उडालं कीं मग तें इकडे तिकडे धांवूं लागतं. माझ्या पलीकडच्या ब्लॉकमध्यें एकदोन पुरुष व एकदोन स्त्रिया बसलेल्या होत्या. ती मंडळी कांहीं मला दिसत नव्हती. पण त्यांचें बोलणें मात्र मला पूर्णपणें ऐकूं येत होतें.

' त्यांच्यामध्यें कमल्या तरी वादाला मोठा रंग आला होता त्यांचे शब्द आपण होऊन माझ्या कानांवर येत होते. तेव्हां साहाजिकच माझें लक्ष तिकडें वळलें.

' त्यांच्यांतील एक प्रौढ बाई [ आवाजावरून मला ती

प्रौढ असावी असें वाटलं ] सांगत होती–' एकदां लग्न करून दिलं कीं हीं मुलं पूर्वींच्या सगळ्या गोष्टी विसरून जाऊन संसार करूं लागतात. एक प्रत्यक्ष घडलेलं उदाहरण सांगत्यें म्हणजे तुमची खात्री पटेल. कल्याणला कीर्तने नांवाचे एक गृहस्थ आहेत. त्यांच्या मुलीची गोष्ट. मुलगी इंग्रजी पांच–सहा इयत्ता शिकलेली आहे तिची आणि एका तरुण मुलाची ओळख झाली. ती ओळख पुढें इतकी वाढली कीं त्यांनीं आपसांत विवाह करण्याचं देखील ठरवलं. एर्वी तेर्वीं त्यांचं लग्न व्हायचंच आहे म्हणून आईबापांनींही त्यांच्याकडे जरा दुर्लक्ष केलं. गांवांत त्यांच्याबद्दल भलभलते प्रवाद ऐकूं येऊं लागले. पुढें ऐन लग्नाच्या वेळीं त्या मुलानं लग्न करण्याचं साफ नाकारलं. मुलीनं जीव देण्याची देखील भीती घातली, पण तो मुळींच बधला नाहीं. पुढं दुसऱ्या एका मुलीशीं लग्न करून देखील तो मोकळा झाला. पुढच्या वर्षी त्या मुलीचांहि लग्न झालं. तिचा नवरा इथंच कुठं अंधेरीला कीं सान्ताक्रूझला मास्तर आहे म्हणे. आतां त्या मुलीचा संसार कसा सुरळीत चालला आहे. या उदाहरणावरून काय दिसून आलं तुम्हाला ? '––

' पुढील संभाषण ऐकण्यास मीं तिथं बसलों नाहीं. ' कल्याण ' ' कीर्तने ' ' मुलगी ' ' लग्न ' ' मास्तर ' ' सान्ताक्रूझ ' इत्यादि शब्दांनीं माझें मस्तक भणाणून सोडलें. माझ्याशीं विवाह होण्यापूर्वीं सरलेनें आपलें हृदय एका तरु–

णाला दिलें होतें !—केवढी असह्य कल्पना ! सरलेची माझ्या-
वर असलेली प्रीति म्हणजे निव्वळ ढोंग आहे तर ! ...

' मी दादरच्या स्टेशनवर केव्हां आलों, गाडींत केव्हां बसलों, माटुंगा रोड, माहीम, वांद्रा, खार, हीं स्टेशनें केव्हां गेलीं, सान्ताक्रूझला मी केव्हां उतरलों आणि घरीं केव्हां पोंचलों, हें माझें मलाच कळलें नाहीं.

' जिन्यावर माझी चाहूल लागतांच सरलेनें दार उघडून सस्मित वदनानें माझें स्वागत केलें. पण त्या स्मिताचें गुणग्रहण करण्याच्या मनःस्थितींत मी नव्हतों. अत्यंत भेदक नजरेनें मीं तिच्याकडे पाहिलें. तिच्या दिखाऊ प्रीतीच्या खालीं दडलेल्या ढोंगीपणाला मला खेंचून बाहेर आणावयाचें होतें. एक चकार शब्दही न बोलतां मीं माझ्या खुर्चीवर अंग टाकून दिलें.

' माझ्या मनांतील खळबळ कशी व्यक्त करावी हें मला कळत नव्हतें. उगीच आरडाओरड करण्यांत कांहीं तथ्य नव्हतें. आपलें गृहछिद्र उघड्यावर यावें असेंहि मला वाटत नव्हतें.

पांच-दहा मिनिटें अशाच भीषण स्तब्धतेंत गेलीं. माझ्या रागाची सरलेला फार भीती वाटत असे. मी रागावलों कीं तिचा चेहरा म्लान होत असे आणि एरवीं माझ्यासभोंवती घोटाळणारी सरला त्यावेळीं माझ्यापासून दूरदूर पळत असे. तिच्याविषयीं माझ्या अंतःकरणांत असलेली प्रीति तिचें हें

केविलवाणें दृश्य मला पाहूं देत नसे. माझा राग झपाट्यानें शांत होत असे. आणि मग मृदु आवाजांत मी हांक मारी—
' सरू, सरला—'

' या वेळींहि म्लान वदन करून ती दूर गेली. पण नेहमींप्रमाणें माझा राग मात्र शांत झाला नाही. तिच्याकडे पाहण्याचा माझा दृष्टिकोनच बदलला होता. ती लबाड आहे, ढोंगी आहे. आपल्या गुपिताचा तिनें पत्ताच लागूं दिला नाहीं, हेच विचार माझ्या मनांत थैमान घालीत होते.

' अखेर तिच्याकडे रोखून पहात मीं विचारलें—

' सरला, माझ्यावर तुझी खरी प्रीती आहे ना ?'

' हें काय विचारणं ?'

' मग माझ्यापासून एक गोष्ट तूं चोरून कां ठेवलीस ?'

' कोणती गोष्ट ?'

' माझ्याशीं तुझं लग्न होण्यापूर्वी तुझं दुसऱ्या एका तरुणावर प्रेम होतं. त्याच्याशीं तुझं लग्नहि व्हायचं होतं. तूं ही गोष्ट माझ्याजवळ सांगितली नाहींस. तूं माझ्याशी लबाडी केलीस. तुझ्या वडिलांनी देखील या गोष्टीचा कानोसा मला येऊ दिला नाहीं. तुम्हीं सर्वांनीं मला फसवलं आहे. तुम्हीं माझ्याशीं लबाडी कां केलीत ? तुम्ही ही गोष्ट मला अगोदर कां नाहीं सांगितलीत ? ही गोष्ट मला अगोदर कळली असती तरी देखील मीं तुझ्याशीं लग्न केलं असतं. मी कोत्या मनाचा मनुष्य नाहीं. ऊलट पुरुषाच्या फसव-

णुकोला बळी पडलेल्या एका मुलीशीं लग्न करण्यांत मला अभिमान वाटला असता. पण तुम्ही ही गोष्ट मला अगोदर कळवली नाहीत. तुम्हीं माझ्याशीं प्रतारणा केलीत. मी तुमचं असं काय नुकसान केलं होतं कीं अशा प्रकारची लबाडी तुम्ही माझ्याशीं करावी ?' प्रत्येक वाक्यागणिक नकळत माझा स्वर चढत होता.

'माझे प्रश्न अखेरपर्यंत सरलेला ऐकवले नाहींत ती मटकन् खाली बसली. दुसऱ्या क्षणी तिच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह सुरू झाला.

'त्या स्थितींत तिच्यावर प्रश्नाचा आणखी भडिमार करणें माझें मलाच बरें वाटेना. मी तक्तपोशीकडे पहात तसाच आरामखुर्चीवर पडून राहिलों.

'कांहीं वेळानें सरला उठली. तिनें अश्रू पुसले. मला वाटलें ती आतां कांहींतरी खुलासा करील, पण छट् ! ती एक अक्षरहि बोलली नाहीं. तिनें एक सतरंजी पसरली आणि चादर घेऊन मुस्कट मारली. त्यानंतर हूं नाही कीं चूं नाहीं.

'मी बराच वेळ जागा होतों. पृथ्वीच्या पोटांत असलेला लाव्हा रस जसा खदखदतो तसा आंतल्या–आंत माझा राग खदखदत होता. पण शेवटीं त्या लाव्हा रसाला कुठें तरी संधी मिळते आणि ज्वालामुखीच्या रूपानें तो लाव्हा रस खळखळत बाहेर पडतो, त्याप्रमाणें

माझ्या रागाची आणि उद्वेगाची स्थिती झाली. कल्याण येथें रहात असलेल्या माझ्या श्वशुरावर माझ्या रागाचें उट्टे काढण्याचें मीं ठरविलें आणि त्यांना एक पत्र लिहावयास घेऊन मीं माझ्या रागाच्या लाव्हा रसाला वाट मोकळी करून दिली.

'त्या पत्रांत मी कोणता मजकूर लिहिला हें आतां मला अक्षरश: सांगतां येणार नाहीं. पण त्या पत्रांत कोणता मजकूर असेल, पत्राची भाषा कशी असेल, इत्यादि गोष्टींची कल्पना तुम्हाला सहज करतां येईल.

--३--

'पत्राचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. पत्र पोंचतांच कल्याणहून माझे श्वशूर निघाले आणि मी शाळेंतून घरीं येण्यापूर्वीच ते आमच्या घरीं येऊन पोंचले.

'मी घरीं आलों. कुशल वगैरे विचारण्याइतकाहि वेळ त्यांनीं मला दिला नाहीं. मला पहाताच त्यांनीं विचारलें,

'काय भाऊसाहेब, चहा वगैरे घ्यायचा असेल आतां तुम्हाला ?'

'नाहीं. शाळेंत झालाच आहे.' मी उत्तर दिलें.

'मग इथें असें खुर्चीवर बसा तर.'

'मी त्यांच्या समोरच्या खुर्चीवर बसलों.

'आपलें पत्र पोंचलें' त्यांनीं बोलण्यास सुरवात केली—'आपलें पत्र वाचून मला राग मात्र आला नाहीं. आपण जरी आम्हां सर्व वडील मंडळींना दोष दिलेला आहे तरी

आमच्याकडे कांहींच दोष नाहीं अशी आमची मनोदेवता आम्हांस सांगत असल्यामुळें आम्हांला आपल्या पत्राबद्दल कांहींच राग आला नाहीं. तुमची कल्पना सर्वस्वी बरोबर आहे असं आपण गृहीत धरून चालूं. सरलेचें एका तरुणावर प्रेम होतें पण त्या तरुणानं दुसऱ्या एका मुलीशीं विवाह केल्यावर, सरलेनं मात्र त्या तरुणावर प्रेम होतं म्हणून जन्मभर अविवाहित राहावं हा कुठला न्याय? तिचा विवाह झाला यांत काय चुकलं? हें एक झालं. दुसरं असं की ज्या व्यक्तीवर आपलं प्रेम आहे त्या व्यक्तीबरोबरच आपण विवाह करूं, इतराशीं करणार नाहीं, अशा निश्चयानं जर मनुष्य प्राणी वागूं लागेल तर जगांत अविवाहित लोकांचीच संख्या वाढूं लागेल. ज्या व्यक्तीवर आपलं प्रेम आहे. त्या व्यक्तीबरोबर आपण विवाह करणं, ही गोष्ट नेहमींच शक्य नसते. मला अशी माहिती मिळाली आहे, कीं आपण ज्यावेळीं बी. ए च्या वर्गांत होतां त्या वेळीं आपलहि प्रेम एका व्यक्तीवर होतं. पण आपण तरी कुठें त्या व्यक्तीशीं विवाह केला? आपल्या बाबतींत जो नियम लागूं ताचे नियम सरलेच्या बाबतींत कां लागूं करतां येणार नाहीं? तिसरं असं, कीं विवाहानंतर सरला तुमच्याशीं अत्यंत प्रेमळपणानें वागत आली आहे ना? मग ही गोष्ट लक्षांत घेऊन तिच्या पूर्व चारित्र्यावर एखादा कलंक असला तर तुम्ही तो क्षम्य कां मानूं नये?—माझे मुद्दे तुम्हांला पटतात कीं नाहीं?'

' पटतात. पण....पण........

' थांबा, तुमचें तें 'पण' संपण्यापूर्वी आणखी एका गोष्टीचा खुलासा करतों म्हणजे तुमचं मन साफ होईल. ज्या मुलीबद्दल हे रिपोर्ट तुमच्या कानांवर आले ती मुलगी म्हणजे सरला नव्हे. '

काय, म्हणता' मग कल्याणचे कितेने... '

' हो, माझ्याच आडनावाचे माझे एक दूरचे चुलत-बंधू कल्याणला राहतात. त्याच्या मुलीचा तो इतिहास आहे. त्या मुलीचं लग्न आतां झालेलें आहे आणि ती आपल्या नवऱ्या-सह सध्यां अंधेरीला राहते. तिचे यजमान तिथल्या एका शाळेंत शिक्षक आहेत. हवे तर आताच आपण अंधेरीस तिच्या घरीं जाऊं. '

' आतां मात्र मी पुरा गार झालों. आपल्या नांवापुढें बी. ए. हा किताब डौलानें मिरवणारा मी—मला एका आड-नांवाच्या दोन व्यक्ति असूं शकतात एवढा साधा विचारहि सुचला नाहीं ! आणि मी पढतमूर्खानें सरलेसारख्या देवतेला केवढा त्रास दिला.

' माझ्या मूर्खपणाबद्दल माझा मलाच राग येत होता आणि सरलेला व्यर्थ छळल्याबद्दल अंतःकरणावर पश्चातापाचे घाव पडत होते; व त्या घावांखालीं माझ्या अंतःकरणाचे शतशः तुकडे होत होते.

' श्वशुरांना ' आलात तसे एक दिवस राहून जाण्या—

बद्दल मी आग्रह केला. पण कांहीं जरूरीच्या कामानिमित्त संध्याकाळच्याच गाडीनें ते परत कल्याणला गेले.

' श्वशुरांनीं शेवटीं जो खुलासा केला तोच जर सरलेनें अगोदर केला असतां तर एवढा ग्रंथ कशाला वाढला असतां ? तिनें तो खुलासा कां केला नाहीं ? ती रडत कां बसली ? कां हा स्त्री स्वभाव आहे ? कां हा सरलेचा विशिष्ट स्वभाव आहे ? अशा तऱ्हेचे अनेक प्रश्न माझ्या मनांत डांचत राहिले.

४

' दुसऱ्या दिवशीं शाळेंतून परत आल्यावर चहा घेत असतां मी म्हणालों ' सरू, आज आपण जुहूवर फिरायला जाऊं.'

' त्याप्रमाणें थोड्या वेळानें आम्ही एका गाडींतून जुहूला निघालोंहि.

' वाटेंत आम्ही कुणी कुणाशींच बोललों नाहीं. झाल्या प्रकाराबद्दल मी मनांतल्या मनांत चूर होऊन गेलों असल्यामुळें काल्पासून माझी जीभ जड झालेली होती. सरलेच्या मनां-तील पीळही अजून नाहींसा झाला नसल्यामुळें तिच्याकडून बोलण्याची सुरवात होईल ही अपेक्षाहि व्यर्थ होती.

' शेवटीं आम्ही एकदां जुहूच्या वाळवंटावर येऊन पोंचलों.

' समुद्राला नुक्तीच भरती येऊन गेली होती. पाणी पार मागें हटलें होतें. पण सपाट वाळवंटावर पाणथळींच्या रूपानें भरतीचा अंश अद्यापहि दृष्टीस पडत होता. लाटांचा धीरगंभीर आवाज कानांवर आदळत होता. तो सुट्टीचा दिवस

नसल्यामुळें लोकांची फारशी गर्दी नव्हती. तथापि वाळवंटांत ठिकठिकाणीं लोक बसलले दिसत होते. ' नारेलका पानी '-वाले नारळांनीं भरलेली करंडी डोक्यावर घेऊन गिऱ्हाइकाच्या शोधार्थ इकडे तिकडे फिरत होते. कांहीं प्रणयी जोडपीं अगदीं समुद्र कांठानें ओल्या वाळूंतून चाललेलीं दिसत होतीं. एक-दोन युरोपिअन घोडेस्वार वाळवंटांतून घोडीं दामटीत निघाले होते. गुजराथी पोरांचें एक टोळकें एका मेलेल्या सापाशीं खेळत हास्यविनोद करीत होतें आणि त्या हास्यविनोदाचे फवारे भोंवताली बऱ्याच दूर अंतरावर ऐकूं जात होते. किरि-स्तावांची पोरें हॉकीनें खेळत होतीं. त्यांच्या हालत्या आकृति दूर वाळवंटांत दिसत होत्या.

' तीन दिवसांपूर्वी दादरला ती हकीकत ऐकून मी जसा क्रोधाविष्ट होऊन घरीं निघालों तसाच सूर्यनारायण देखील क्रोधानें लाल होऊन समुद्रापलीकडे असलेल्या आपल्या घराकडे निघाला होता. आणि पूर्व दिग्भागीं नुक्ताच उगव-लेला चंद्र समुद्र कांठावरच्या नारळीच्या दाट झाडीमागून हळूंच डोकावून पाहात हंसत होता.

' पलीकडच्या बंगल्यांतून दिवे लागले.

' पाणथळींवरून आम्ही दोघेहि मंद गतीनें चाललों होतों. पण येवढया वेळांत किती तरी दूर गेलों होतों. आस-पास कुणीहि दिसत नव्हतें.

' अखेर मींच विचारण्याचें धाडस केलें–' सरू तुला

काल जेव्हां मी ते प्रश्न विचारलें तेव्हां 'ती मुलगी मी नव्हे.' असं उत्तर देऊन तूं कां मोकळी झाली नाहींस ? तूं उत्तर दिलं नाहींस म्हणून आपणां दोघांना आणि पुढें तुझ्या वडिलांनाहि केवढा त्रास झाला ! तूं एक अक्षरहि बोलली नाहींस; उलट रडूं लागलीस !

'माझ्यावर आपलं खरं प्रेम आहे ना?....पण स्वतांचा क्षणांत गैरसमज करून घेऊन माझ्यावर जे आरोप केलेत त्यावरून पुरुषांच्या प्रेमाचा स्वभाव मला कळून आला आणि वाईट वाटून रडूं आलं. पतीवरील प्रेम हेच आम्हां स्त्रियांचं जीवनसर्वस्व असतं. त्या जीवनसर्वस्वांत गैरसमज करून घेऊन खुद्द त्यांनींच विषबिंदू टाकला तर—'

'पण पुरुषांचं प्रेम जसं क्षणांत गैरसमज करून घेतं तसंच तें क्षणांत तो गैरसमज विसरूनही जातं. आतांच त्याचं प्रत्यंतर पहा.'

'आसपास लोक तर नव्हतेच. पण चंद्रहि आपल्या अस्तित्वामुळें आम्हांस संकोच वाटूं नये म्हणून किंचित्काल ढगांआड लपला.'



## पत्रोत्तरें :-३

पत्रं आलीं कीं त्यांचीं उत्तरं पाठवायला आपल्याकडून बिलकूल दिरंगाई होऊं नये असं मला कितीतरी वाटतं. पण केवळ असं वाटून काय उपयोग? दिरंगाई होते खरी!

म्हणजे असं होतं-उत्तर लिहायला मुळीं वेळच नसतो. बरं, वेळांतून वेळ काढून लिहायला बसलों तर तेवढ्यांत कसलं तरी निकडीचं काम निघतं अन् तें पत्र तसंच अर्धवट राहातं. बरं, एकाद्या वेळीं उत्तर लिहून तयार झालं तरी तें बंद करायला लिफाफाच नसतो! लिफाफा असला, पत्र लिहायला वेळ मिळाला, तरी फाउन्टन पेनमध्यें शाईच नसायची, अन् शाई असली तर निदान टोंक तरी नादुरुस्त असायचं!

अशा अडचणी येतात अन् पत्रोत्तर जायला दिरंगाई होऊं नये असं मला किती वाटलं तरी दिरंगाई होते; अन् दिरंगाई झाली असं माझी सदसद्विवेकबुद्धि मला सांगूं लागली कीं, एकदां सगळा जामानिमा करून आमची स्वारी पत्रोत्तरं लिहायला बसते.

पण इतक्या उशिरानं जागृति आल्यावर होतं काय ? तर कित्येक पत्रांना मुळीं उत्तरं लिहायचीच जरूर असत नाहीं, अन् कांहीं पत्रांना उत्तरं लिहायची जरूर असली तरी पोस्टाचे वाढलेले दर लक्षांत घेतल्यावर मी तीं शक्य तर लिहायचींच टाळतों.

तात्पर्य काय, कीं उत्तरं पाठविण्यांत दिरंगाई करणारा मनुष्य अशी माझी कुप्रसिद्धी न व्हावी म्हणून माझे प्रयत्न असतात, अन् माझ्या प्रयत्नांना न जुमानतां माझी कुप्रसिद्धि फैलावत असते.

अगदीं ताजं उदाहरण—

रविवारचा दिवस होता, तेव्हां कामाची वगैरे कांहीं दगदग मागं नव्हतीच. भोजन नुकतंच झालं होतं, तेव्हां आठवड्यांतून एकदांच मिळणारा वामकुक्षीचा अलभ्य लाभ सोडून देणं अगदीं जिवावर आलं. पण गेल्या आठवड्यांत आलेल्या पत्रांचीं उत्तरं आज लिहायचींच असा निर्धार मी सकाळींच करून चुकलों होतों. अन् त्या निर्धारास अनुसरून माझ्या टेबलाच्या खणांतील सात–आठ पत्रं मीं बाहेर काढली या सातआठ पत्रांना माझीं उत्तरं अद्याप जायचीं होतीं !

पहिलं पत्र माझ्या बाळपणींच्या एका स्नेह्याकडून आलं होतं; दुसरं माझ्या वडिलांच्या स्नेह्याकडून आलं होतं; तिसरं माझ्या मामांच्याकडून आलं होते. चटकन् माझ्या मनांत विचार आला कीं, एकामागून एक अशीं पत्रं त्यला-

यचीं, वाचायचीं, अन् त्यांचीं उत्तरं लिहावयाचीं हा कांहीं चांगला मार्ग नाहीं. कारण, असं करण्यानं वेळेची, पैशाची अन् पत्रलेखनास जरूर असलेल्या साहित्याची व्यर्थ हानि होणार आहे. तेव्हां आपण या पत्रांचे तीन गट पाडूं. पहिला गट—जरुरीचीं पत्रं. म्हणजे ज्या पत्रांस तावडतोब उत्तरं गेलीं पाहिजेत अशीं पत्रं. दुसरा गट—ज्यांना उत्तरं पाठविणं जरुरीचं आहे, पण तीं उत्तरं आजच पाठविलीं पाहिजेत असं नाहीं, अशीं पत्रं; अन् तिसरा गट—ज्यांना मुळींच उत्तरं पाठविणं जरुरीचं नाहीं अशीं पत्रं. अन् असे तीन पृथक् गट केल्यानंतर मी पहिल्या गटांतलं पहिलं पत्रं उचललं.

तें पत्र माझ्या वडिलांच्या मित्राकडून आलेलं होतं. अनेक आशीर्वाद. हवापाणी, क्षेमकुशल, वगैरे वगैरे महत्वाचा मजकूर संपल्यावर अगदीं शेवटीं त्यांनीं लिहिलं होतं—

"तुमच्या गांवीं कमलाकांत बऱ्हाणपूरकर या नांवाचे किंवा यासारखंच जवळ जवळ ज्यांचं नांव आहे असे कुणी गृहस्थ आहेत का? असे गृहस्थ असल्यास त्यांचं वय, त्यांचं सालिना उत्पन्न, त्यांचं गोत्र, त्यांच्या घरची मंडळी, याबद्दलची माहिती काढून तावडतोब पाठवावी."

कमलाकांत बऱ्हाणपूरकर? नांव कुठंतरी ऐकल्यासारखं कुठंतरी वाचल्यासारखं वाटतं. पण कुठं वाचलं असावं बरं? हां! हां! आलं लक्षांत. ही स्वारी परवां कुठल्यातरी विभागातर्फे म्युनिसिपॅलिटीच्या निवडणुकीला उभी राहिली

होती खरी. आतां निवडणुकीला उभे राहिलेल्या उमेदवारांची यादी चाळली पाहिजे; म्हणजे या प्राण्याचं निश्चित नांव अन् तो कोणत्या विभागातर्फे निवडणुकीला उभा राहिला, म्हणजे कोणत्या विभागांत तो राहतो, एवढी तरी माहिती मिळेल.

अन् त्यानंतर आंतल्या खोलींतील वर्तमानपत्रांच्या गठ्ठ्यांत माझं संशोधन सुरू झालं. तब्बल तासाच्या दीर्घ प्रयत्नानंतर एकदांची ती यादी मिळाली. पण त्या यादींत सदर गृहस्थाचं नांव कमलाकांत बऱ्हाणपूरकर असं नसून कमलाकर धरमपूरकर असं छापलेलं आढळलं.

तेव्हां आजच्या पत्रोत्तरीं सदर गृहस्थांचं नांव आणि त्यांच्या निवासस्थानाचा विभाग एवढीच माहिती पाठवावी व पुढील माहिती पुढच्या पत्रीं, असं अश्वासन देऊन टेवावं असा विचार करून मी पत्रोत्तर लिहायला बसलों.

फार दिवसांनी माझी आठवण झाली याबद्दलचा संतोष, क्षेमकुशल वाचून झालेला आनंद, इत्यादिकांचं सविस्तर वर्णन झाल्यावर मी पत्राच्या मुख्य मुद्याकडे वळलों तोंच आमच्या साहेबांच्या घरचा शिपाई साहेबाकडून काहीं निकडीचा निरोप घेऊन आला आहे अशी मला वर्दी आली.

पत्र तसंच अर्धवट टाकून मी बाहेर आलों. साहेबांचा निरोप नित्याच्या परिचयांतलाच होता—" निकडीचं काम आहे. सबब ताबडतोब यावं."

सुटीदेखील अंगाला न लागूं देणाऱ्या या खाष्ट साहे-

बाला मनांतल्या मनांत मीं शंभर शिवी मोजली असेन; पण बाहेरून सुटी दिवशीं देखील साहेबांना आपल्याशिवाय भागत नाहीं, ही केवढी प्रौढीची गोष्ट आहे, असं दर्शविणरा आविर्भाव चेहऱ्यावर आणून मी त्या शिपायाला म्हणालों, 'पुढं हो तूं. साहेबांना सांग, पोषाख करून आलोंच म्हणून'.

मी आंत आलों. त्या अर्धवट राहिलेल्या पत्राकडे मी एकदां दीन मुद्रेनं पाहिलं. पोषाख करीत असतांना मीं मनाशीं निर्धार केला कीं, साहेबकडचं काम झाल्यानंतर तसंच परस्पर पोस्टांत जायचं नी एक कार्ड विकत घेऊन तिथल्या तिथंच भरकन् लिहून टाकायचं.

पण तें तऱ्हेवाईक नांव लक्षांत राहील ना?

न राहिला काय झालं? इतकी का ढिली आहे आमची स्मरणशक्ति?

पण स्मरणशक्तीवर इतकं तरी विसंबून कां रहा? घोकून तोंडपाठच करून टाकूं तें नांव.

अन् मीं घोकायला सुरवात केली—

**कमलाकर माधवपूरकर! कमलाकर माधवपूरकर!! कमलाकर माधवपूरकर!!!–**

दुःखाची गोष्ट एवढीच कीं, टपालाची वेळ टळून गेली तरी त्यादिवशीं साहेबांनीं माझी सुटका केली नाहीं; अन् तें पत्रोत्तर लिहायचं तसंच राहून गेलं!

---

# जिवंत खेळणें : :– ४

विद्याधर आज कचेरींतून दोन वाजतांच घरीं परत आला. आणि नेहमींप्रमाणें आपल्या लहानग्या भाच्याशीं किंवा आपल्या वडील बहिणीशीं दोन गमतीचे शब्द बोलल्याखेरीज तो माडीवरच्या आपल्या खोलीकडे गेला.

तेव्हां ताईना आणि ताईच्या 'उषावन्सं'नाहि थोडे आश्चर्य वाटलें. थोड्या वेळानें ताईनीं चहाचे दोन पेले माडीवर नेले. त्या वेळीं विद्याधर कसल्याशा गूढ विचारांत गढून गेलेला असा त्यांना दिसला. ताईना आलेल्या पाहातांच विद्याधर आपल्या विचार तंद्रींतून जागा झाला आणि तोंडावर बळेंच हंसें आणून म्हणाला—

'एवढ्या उन्हांत चहा!–हो, पण तो नाकारायचीहि सोय नाहीं. नाकारला कीं, ताईसाहेबांना लागलीच राग यायचा!' बोलत असतांच तो उठला आणि टिपॉयशेजारच्या एका खुर्चीवर येऊन बसला.

'भाऊसाहेब, असल्या क्षुल्लक गोष्टींत माझ्या रागाला आपण जपतां, पण आमच्या उषावन्संना पदरांत घ्यायची

गोष्ट काढली कीं कुठल्या ताईसाहेब अन् कुठल्या बाईसाहेब! ' किटलींतून कपांत चहा ओतीत असतां ताई किंचित उसन्या रागानें बोलल्या. यावर एक खासें उत्तर देण्यासाठीं विद्याधरानें ओठांची हालचाल केली सुद्धां, पण तोंच जिन्यावर कुणाचींशी-कुणाचींशी कां? उषेचींच— पांवलें वाजलीं अन् विद्याधराचें तें खासें उत्तर जिभेवरच्या जिभेवरच विरून गेलें.

जिन्यावर वाजलेलीं उषेची पावलें विद्याधराला चटकन् ओळखत. कारण उषा जिन्यावरून केव्हांहि सावकाश उतरत नसे अगर चढत नसे. यंदा ती मॅट्रिकच्या परीक्षेस बसणार होती, पण तिच्या ठिकाणचा मुग्धपणाचा उत्साह किंचित्हि कमी झालेला नव्हता. तिच्या चालण्यांत, बोलण्यांत वागण्यात क्षणोक्षणीं हा उत्साह प्रतिबिंबित होत असे.

आतां ती वर आली तेव्हा तिच्या कपाळावर तिचे कुरळे आणि किंचित् भुरके केस रुळत असलेले दिसत होते. पण तिच्या चेहेऱ्यावरील नेहमीचें खेळकर हास्य थोडें कमी होऊन काळजीची एक नाजुक छटा त्या ठिकाणीं प्रतिबिंबित झालेली दिसत होती. गुलाबाच्या कोमल फुलाला दंवबिंदूचाहि भार सहन न होऊन तें दबल्यासारखें दिसत नाहीं का?—

तीं तिघेहि चहा घेत होतीं. पण कुणीच बोलत नव्हतें. ताईचीं अपेक्षा अशी कीं, विद्याधर आपण होऊन आपल्या संचितपणाचें कारण सांगेल. उषेची हीच अपेक्षा होती. आणि

मधूनमधून एक दोनदां आशाळभूत उत्सुकतेनें तिनें विद्याधराकडे पाहिलेंहि. उषेचा आशय विद्याधराच्या लक्षात आला. उषेच्या आनंदी चेहऱ्यावर पसरलेल्या सचिंतपणाचें कारण आपला सचिंतपणा हेंहि त्याच्या लक्षांत आलें. तथापि त्यानें आपल्या सचिंतपणाचें कारण सांगितलें नाहीं. कारण तें कारण त्यांना सांगण्यासारखें नव्हतेंच.

चहा झाला तरी कांहींच बोलणें निघत नाहीं असें पाहून ताईनीं अखेर विचारण्याचें धाडस केलें—

‘ भाऊ, कसल्या काळजींत आहेस रे ?

‘ काळजींत ? अन् मी ? कांहीं तरीच. ताई, मीं कशाबद्दल काळजी करावयाची ? नव्या वकिलांना काळजी म्हणजे मुख्यत: त्यांच्या धंद्याबद्दलची. पण मला त्याची पर्वा नाहीं. वडिलांच्या पुण्याईनें म्हण, अगर माझ्या पुण्याईनें म्हण, मला कसल्याहि गोष्टीची उणीव नाहीं ! मग काळजी कशाबद्दल ? ’

ताईनीं ओळखलें कीं खरें सांगायचें याच्या मनांत नाहीं. तेव्हां त्यांनींहि फारशी पृच्छा केली नाहीं. त्यांनीं चहाचें सामान आवरलें व त्या खालीं निघून गेल्या. उषाहि त्यांच्या-बरोबर खालीं निघून गेली.

त्या दोघीजणी निघून गेल्यावर विद्याधर फिरून आपल्या आरामखुर्चीवर पडला. त्याचें विचारचक्र पुनश्च सुरूं झालें.

' उषा कीं संध्या ? '

दहा दिवसांपूर्वी त्यांच्या मनापुढें असा प्रश्न उभा राहिला असता कां ? मुळींच नाहीं. पण नाताळच्या सुट्टीच्या निमित्तानें डॉक्टर विश्वासराव बंगलोरास आपल्या एका स्नेह्या-कडे निघून गेले आणि जातांना त्यांनीं आपल्या पत्नीला आणि आपल्या बहिणीला— उषेला— आपल्या पत्नीच्या भावा-कडे— विद्याधराकडे पाठवून दिलीं. आतां नाताळची सुटी संपली तरी बंगलोरहून परत आल्याबद्दलचें त्यांचें पत्र आलें नव्हतें. त्यामुळें उषेच्या शाळेची खोटी होत होती तरी तिला आणि ताईना राहणें भाग पडत होतें.

उषेचा खेळकर स्वभाव विद्याधराला पहिल्यांदा बालिश असाच वाटला. पण जगांतल्या प्रत्येक गोष्टींत रमून जाण्याचें, प्रत्येक गोष्टीपासून आपल्या आनंदाचा वांटा वसूल करून घेण्याचें, तिचें मानसिक सामर्थ्य जसें विद्याधराच्या प्रत्ययास येऊं लागलें तसें त्याचें अवधान सुटत जाऊन तो उषेच्या आकर्षतेच्या जाळ्यांत जास्तजास्तच गुरफटत चालला.

पण आकर्षता म्हणजेच प्रेम काय ? उषेला ' प्रीती ' चा स्वभाव माहीत तरी आहे काय ?

विद्याधराला या प्रश्नांचें समाधानकारक उत्तर मिळेना.

—मात्र संध्येला ' प्रीती ' च्या स्वभावाची पूर्ण कल्पना होती.

संध्या !—

त्या नांवासरशीं गतवर्षाचा सारा इतिहास त्याच्या मनः-चक्षूंवर उभा राहिला. वडिलांचें आजारीपण, मुंबईस त्यांच्या-वर करावी लागणारी शस्त्रक्रिया, मुंबईस असतांना वडिलांच्या स्नेह्याच्या मुलीबरोबर–संध्येबरोबर झालेला त्याचा परिचय, वडिलांच्या आजारीपणांत संध्येची त्याला झालेली मदत, संध्येच्या शुश्रुषनें प्रसन्न झालेल्या त्याच्या वडिलांचा प्रसन्न चेहरा, जुहूच्या किनाऱ्यावर अफाट दरियाच्या आणि मावळत्या सूर्याच्या साक्षीनें त्यानें संध्येस दिलेलें विवाहाचें वचन, त्या वचनाचा कानोसा लागतांच त्याच्या वडिलांनीं प्रगट केलेला संतोष, त्यानंतर दोनच दिवसांनीं झालेलें वडिलांचें देहावसान, वडि-लांच्या मृत्यूमुळें येऊन पडलेली जबाबदारी, आणि इस्टेटीच्या देण्याघेण्याच्या भानगडीमुळें मागें पडलेला विवाह....

संध्यासमयीं आकाशाच्या रंगभूमीवर तारका पटपट जमतात आणि थोड्याच वेळांत त्या तारकांनीं ती रंगभूमी फुलून जाते, त्याप्रमाणें ते प्रसंग एकामागून एक असे भराभर येऊन त्याच्या मनःचक्षूंसमोर उभे राहिले, आणि कांहीं केल्या ते तिथून बाजूला होईनात.

मध्येंच त्याला शंका आली–आपल्या स्वभावांत एखादा दोष तर नाहींना? संध्येच्या सहवासांत असतांना संध्या आवडावी, उषेच्या सहवासांत असतांना उषा आवडावी....

ही नवीन शंका मनांत उद्भवल्यानंतर तर त्याच्या मनाची स्थिती जास्तच अनुकंपनीय झाली.

त्याला एका ठिकाणीं बसवेना. तो अस्वस्थ चित्तानें आपल्या जागेवरून उठला. मध्येंच त्यानें एकदां घड्याळाकडे पाहिलें. पांच वाजले होते. त्यानें एखाद्या स्नेह्याकडे जाण्याचा विचार करून कपडे चढविले. तो खालीं आला. खालीं त्याचा भाचा बबन खेळत होता. आपल्या मामास पाहतांच तो त्यास बिलगला आणि म्हणाला, ' मामा, आज आमाला सिनेमाला नेनाल ना ?'

' छे ! लहान मुलं कुठं सिनेमा पाहतात काय ? '

' असं का ले मामा ! आमाला ने ना सिनेमाला ! '

' बरं, बरं. मी आतां तिकिटं काढून आणायला जातों. तोंपर्यंत तूं कुठं तरी दूर खेळायला जा हं. '

दाणे टिपीत असलेला पक्षी भुर्कन् उडून जावा तसा तो आनंदी बालजीव भर्कन् बाहेर खेळायला गेला.

संध्याकाळीं परत येतांना त्यानें सिनेमाच्या खेळाचीं तिकिटें काढून आणलीं.

तीं सगळीजणें जो चित्रपट पाहण्यास गेलीं होतीं, तो एक इंग्रजी रंगीत बोलपट होता. रंगास संगिताची जोड देण्यांत आली असल्यामुळें, व कथानकांत उत्तान शृंगाराचे कांहीं प्रसंग असल्यामुळें, आणि उषा आपल्याजवळ बसलेली आहे याची जागती जाणीव असल्यामुळें, मधील विश्रांतीच्या वेळांत त्याला वाटलें- ' उगीचच आलों आपण या चित्रपटाला ! ' मधूनमधून उषेचे प्रश्न सुरू होतेच. आणि

त्या प्रश्नांना समाधानकारक उत्तरें देण्याचा विद्याधराचा प्रयत्न सुरू होताच.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो आपल्या खोलींत कांहीं पुस्तकें चाळीत बसला असतां उषा त्याच्या खोलींत आली.

'एक पत्र आलं आहे तुमच्या नांवचं?' उषा म्हणाली.

'असं का! आणा पाहूं.'

उषेच्या हातून त्यानें तो लिफाफा घेतला. लिफाफ्या-वरील हस्ताक्षर पाहतांच त्यानें एकदम चेहरा टाकला. उषेच्या लक्षांत ती गोष्ट येईल म्हणून त्यानें तोंड बाजूला केल्यासारखें केलें. पण उषेच्या लक्षांत ती गोष्ट आलीच. पत्रावरील हस्ताक्षर आणि विद्याधराच्या चेहऱ्यावरील पडलेला फरक, या गोष्टींतील कार्यकारणभाव लक्षांत येतांच उषेचें कुतूहल जास्तच जागृत झालें. पण त्या ठिकाणीं जास्त वेळ उभें राहणें योग्य न वाटून ती खालीं निघून गेली.

दुपारीं जेवण झाल्यावर नित्याप्रमाणें विद्याधर कचेरीस गेला.

स्वयंपाकघरांतील सारें आवरल्यानंतर ताई थोड्या आडव्या झाल्या. आणि थोड्याच वेळांत त्यांचा डोळा लागला.

दुपारची झोप उषेच्या स्वभावास मुळींच मानवण्या-सारखी नव्हती. मनास कांहीं तरी चाळा हवा म्हणून ती विद्याधराच्या खोलींत गेली. सकाळच्या पत्राची गोष्ट तिच्या

मनांत होतीच. तिथें जवळच खुंटीवर सकाळीं विद्याधरानें अंगांत घातलेला गरम कोट टांगलेला होता. तो कोट सकाळीं तिनें विद्याधराच्या अंगांत पाहिला असल्यानें साहजिकच तिचें लक्ष त्या कोटाकडे गेलें. त्या कोटाच्या वरच्या खिशांतून एक कागद बाहेर डोकावत होता. तो पाहतांच तिनें एकदम कयास बांधला कीं, तो कागद म्हणजे सकाळीं विद्याधरास आलेलें पत्र —

तें पत्र पाहूं नये, असा विचार क्षणभर तिच्या मनांत आला. पण तिची उत्सुकता तिला तें पत्र न वाचतां परत ठेवून देण्याची सल्ला देईना. कांपऱ्या हातानें तिनें तें पत्र उलगडलें आणि मजकुराखालची सही पाहिली—' सदैव आपलीच–संध्या'——

विजेचा लहानसा धक्का बसावा तशी तिची क्षणमात्र अवस्था झाली. तिच्या मनांत विचार आले—' संध्या सदैव आपली, आणि आपण सदैव तिचे ! तुमच्यावर हक्क सांगणारी ही संध्या कोण ? '

पत्रावरून कांहीं उलगडा होतो कीं काय हें पहाण्या-साठीं तिनें सारें पत्र वाचलें पण कांहींच उलगडा झाला नाहीं. कारण पत्रांत विशेष असें कांहीं नव्हतेच. ' आपण पुष्कळ दिवसांत पत्र लिहिलें नाहीं, हें बरें केलें नाहीं ' अशा अर्थाची तक्रारवजा सुरवात, घरची सर्व मंडळी खुशाल असल्याचा आणि स्वतःची प्रकृति व अभ्यास ठीक असल्याचा ठराविक

मजकूर आणि शेवटीं पत्रोत्तर जरूर पाठविण्याबद्दलची विनंति, एवढाच त्या पत्रांत मजकूर होता.

पत्रांत महत्वाचा मजकूर नसला तरी त्या पत्रानें उषेच्या मनांत महत्वाची खळबळ उडवून दिली खरी. निर्मळ प्रीतीची कल्पना तिच्या अल्लड मनास अद्याप यावयाची होती. एखादें सुंदर खेळणें पाहिल्यानंतर लहान मुलास तें हवेंसें वाटूं लागतें, त्याप्रमाणें विद्याधर तिला हवासा वाटूं लागला होता. आणि ताई क्वचित् जें कांहीं बोलत, त्यावरून विद्याधर नामक खेळणें आपलेंच आहे, अशी तिची समजूत झालेली होती. पण तें पत्र वाचतांच तें खेळणें आपलें नसून 'संध्या' नामक कुणीतरी स्त्री त्या खेळण्यावर आपला हक्क सांगते, हें दिसून येतांच तिची हक्काची जाणीव जागी झाली. वाटेल त्या प्रयत्नांनीं विद्याधरास संध्येच्या हातीं न लागूं देण्याचा तिनें निश्चय केला. विद्याधराबद्दल एक प्रकारची अपूर्व आपुलकी तिच्या अंतःकरणात उत्पन्न झाली. आपल्या जवळचें खेळणें दुसरें मूल ओढून घेत असतांना पहिलें मूल तें खेळणें आपल्या उराशीं जास्तच कवटाळून धरीत नाहीं का ?

संध्याकाळीं तीं तिघेहि फिरावयास निघालीं.

उषा आज विद्याधरास नेहमींपेक्षां जास्त सुंदर दिसत होती. तिचे केस आज विशेष काळजीनें विंचरलेले त्याला दिसले. बंधनाच्या पलीकडे जाऊन तिच्या सुंदर कपाळावर रुळणारे कांहीं बंडखोर केस तिची शोभा जास्तच वाढवीत

होते. तिच्या तलम अस्मानी पातळाचा पदरही असाच बंडखोर दिसत होता अन्—

घरीं परत आल्यावर जेवण उरकून विद्याधर आपल्या खोलींत गेला आणि टेबलापाशीं बसून त्यानें लिहावयास सुरवात केली—

पुणें,

तारीख ६–११.

प्रिय संध्ये,

तुला पुष्कळ दिवसांत मीं पत्र लिहिलें नाहीं, तेव्हां तूं रागवावेस हे योग्यच आहे. यापेक्षाहि पण तूं जास्त रागावशील असं कांहींसं मला दुःखानं या पत्रात लिहावयाचं आहे.

विवाहच करूं नये, असे विचार अलीकडे माझ्या मनांत येऊं लागले आहेत. विवाह न करतां आपलं सारं आयुष्य आपल्या दुबळ्या देशाच्या उन्नतीप्रीत्यर्थ वेंचावें, असे विचार मनांत येतात. आज आमच्या सारख्या अविवाहित आणि बुद्धिवान कार्यकर्त्या तरुणांची आपल्या देशाला अत्यन्त जरूर नाहीं का?

—कां माझ्या विचारांतच कुठें चूक होत आहे?

—माझी चूक होत असेल तर ती मला समजावून सांगशील का?

एका काळचा तुझा, पण आतां देशाचा होऊं इच्छिणारा

—विद्याधर

प्रीतींतील प्रतारणा झटकन् हेरण्याची उपजत बुद्धि स्त्रियांच्या ठिकाणीं असावी. येरवीं हें पत्र वाचल्यानंतर पत्रांतील एका अक्षरावरही संध्येचा विश्वास बसूं नये, असें कसें घडून येईल ? तिचें मन अस्वस्थ झालें. तिच्या मनांत शंका-कुशंकांचें थैमान सुरू झालें.

पण शेवटीं तिला एक विचार सुचला.

'दादा पुण्यास एका कामांत वकिलाचा सल्ला घेण्या— साठीं म्हणून जायचे आहेत. मीहि त्यांच्याबरोबर पुण्यास जावें काय ?'

आणि मोठ्या युक्तीनें वडिलांबरोबर पुण्यास जाण्याची तिनें परवानगी मिळविली.

पुण्यास आल्यानंतर तिचे वडील वकिलाच्या घरीं गेले, आणि संध्या स्टेशनांवरून तशीच विद्याधराच्या घरीं आली.

त्या वेळीं विद्याधर आपल्या खोलींत आपल्या काय-द्याच्या गंजूं पाहणाऱ्या ज्ञानाला धार लावण्याच्या उद्योगांत होता.

संध्या टांग्यांतून उतरत असतांच ताईनीं तिला ओळखलें.

'संध्या ! अन् एकटीच ? पत्रानं कळवायचं सुद्धां नाहीं ?'

संध्या !

ज्या संध्येनें उषेचें चित्त गेले दोन दिवस बेचैन करून

टाकलें तीच ही संध्या !

उषेला तिथें उभें राहवलें नाहीं. ती झटकन वर गेली. तिचा चेहरा फटफटीत दिसत होता, भ्यालासारखा दिसत होता. आणि आवाजांतहि कंप आलेला होता.

' विद्याधर, संध्या आली आहे ! '

' संध्या ? या वेळीं ? न कळवितां ? एकटीच ? '

तोंच जिन्यावर वर येणाऱ्या माणसाचीं पावलें वाजलीं. उषा खोलींतून झटकन बाहेर आली. विद्याधर खोलींत दिङ्-मूढ होऊन बसला.

उषा खोलीबाहेर आली. त्याचवेळीं संध्या जिन्याच्या वरच्या पायरीवर येऊन पोंचली. जिना संपतांच ती तडक विद्याधराच्या खोलीकडे चालली.

तें पाहतांच उषेची वृत्ति एकदम पालटली. धावणारी हरिणी अखेरच्या क्षणीं उलटते तशी तिची अवस्था झाली. तिच्या अंगीं धैर्याचा संचार झाला. आवाजांत कठोरता आली.

' कुठं चाललांत ? ' उषेनें विचारलें.

' विद्याधरांच्याकडे '—संध्या.

' काय काम आहे तुमचं त्यांच्याकडे ? '

' त्याची चौकशी तुम्हांला ? '—

' चौकशी करण्याचा माझा अधिकार आहे. '—

' नव्हे तो अधिकार माझा आहे. '

त्या संभाषणांतील प्रत्येक शब्द विद्याधराच्या कानांवर

जात होता, पण त्या शब्दांचा अर्थ समजावून घेण्याची त्याच्या बुद्धीची शक्ति अजिबात लोपली होती. मदिरासक्त मनुष्याप्रमाणें त्याच्या हालचालीं होत होत्या. त्याच अवस्थेंत तो बाहेर आला.

एकवार त्यानें संध्येला पाहिलें.

मदिरेची निशा उतरल्यावर मदिरासक्त मनुष्याची जशी अवस्था होते तशीच त्याची अवस्था झाली. आपल्या कृतकर्माबद्दल तो लाजला--ओशाळला. तो झटकन् पुढें झाला आणि संध्येचे दोन्ही हात आपल्या हातीं घेऊन म्हणाला---

'संध्ये, मी चुकत होतों. तुझ्याशीं प्रतारणा करीत होतों. तूं या वेळीं इथं आली नसतीस तर आपल्या जीवनाच्या नद्या भिन्न दिशांनीं वाहिल्या असत्या. ज्या माणसाच्या सहवासांत असावं त्याच्या आहारीं जावं हा माझा स्वभावदोषच माझा गळा का....'

पुढचे शब्द संध्येनें त्याला उच्चारूंच दिले नाहींत.

अवमानित उषा तिथून झटकन् खालीं आली.

ताई नुक्तेंच आलेलें एक पत्र वाचण्यांत गढून गेल्या होत्या. उषेला पाहतांच त्या म्हणाल्या, 'बंगलोरहून परत यायचं झालं आहे. आजच आपल्याला परत घरीं गेलं पाहिजे. पण हें काय? तुमच्या डोळ्यांस पाणी? काय झालं? तुम्हांला कोण बोललं?'

त्याच दिवशीं संध्या आपल्या वडिलांबरोबर परत

मुंबईस गेली.

० ० ०

ताई व उषा याना पोंचविण्यासाठीं विद्याधर त्याच दिवशीं स्टेशनवर आला होता.

लहान लहान चांदीचीं भांडी, ब्लाऊझचें कापड, पुस्तकें, बबनकरतां पुष्कळशीं खेळणीं अशा कितीतरी वस्तूंची खरेदी त्या दिवशीं विद्याधरानें केलेली होती. त्या वस्तूंनच आतां उषेचें मन गुंतून गेलें होतें. आणि सकाळच्या प्रकारचा तिला जवळ जवळ विसर पडला होता.

अखेर गाडी सुटायची वेळ झाली. ताईनीं विद्याधरास जवळ बोलावून घेतलें आणि सांगितलें—

' भाऊसाहेब, एकदां आपलं लग्न आपण लवकर उरकून घ्या. जगांत एकट्यानं दिवस काढण्याची अक्कल तुमच्या ठिकाणीं नाहीं. आजपर्यंत दादांच्या सावलींत दिवस काढलेत, आतां दादांची सावली अंतरली. निराळ्या अर्थानं कां होईना पण दादांची जागा भरून काढण्याची व्यवस्था तुम्ही केली नाहींत, तर तुमची कांहीं धडगत दिसत नाहीं.'

गाडीची कर्णकर्कश शीळ झाली.

ताईचें बोलणें खरें होतें, पण किती कठोर होतें!—

गाडी चालू झाली.

ताई आणि उषा खिडकींतून तोंडें बाहेर काढून विद्याधराकडे पहात होत्या.

त्यांच्या तोंडावरचें हास्य त्याला जणुं कांहीं बजावून सांगत होतें–

' वेड्या , स्त्रियांच्या शब्दांतला कठोरपणा कां जातिवंत असतो ? प्रियजनांशीं बोलतांना त्यांनीं कितीहि कठोरपणा दाखविला तरी तो बाह्यात्कारी असतो. उसना असतो, लटका असतो. '



# खेळ आणि काम :-५

त्या दिवशी कचेरींतील कामाचा मला एवढा कंटाळा आलेला होता की काम संपवून घरीं परत येत असतां नोकरीचा राजीनामा देण्याचा विचार शंभरदा माझ्या डोक्यांत येऊन गेला; पण—

आमच्या घरच्या ओटीवर आमच्या छबूताई दोरीवरून उड्या मारीत होत्या आणि तोंडानें चाललें होतें— " Work while you work, play while you play. " त्या जें कांहीं म्हणत होत्या त्याचा अर्थ त्यांना स्वतःलाच कळत होता कीं नाहीं कोण जाणे ! निदान त्या शब्दाच्या अर्थाकडे त्यांचें त्या वेळीं तरी खास लक्ष नव्हतें. पण त्यांच्या उड्यांना त्या शब्दांचा तालासारखा उपयोग मात्र होत होता खरा !

त्या शब्दांसरशीं मला स्फूर्ति आली—चला क्लबांत ब्रिज खेळायला ! पण ब्रिज खेळतांना तरी माझें खेळाकडे कुठें लक्ष होतें ! लक्ष होतें कचेरींतल्या अपुऱ्या राहिलेल्या कामाकडे. आणि "Work while you work, pay while you play" ची वाट ? मानवी जीवनांत वाणीचा आणि

वागण्याचा नेहमींच मेळ बसत नाहीं हेंच खरें !

बाकी खेळल्यानंतर मनाला हलकें वाटूं लागलें एवढें मात्र खरें. कां बरें असें व्हावें ? काम करतांना मनाला थकवा वाटावा, खेळतांना उल्हास वाटावा, असें कां व्हावें ?

माझ्या प्रश्नाचें समर्पक उत्तर कळण्यासाठीं मी निरनिराळे ग्रंथ वाचूं लागलों. निरनिराळ्या ग्रंथकारांनीं दिलेल्या खेळांच्या मीमांसा वाचण्याचा मला कांहीं दिवस छंदच लागला होता. " खेळ म्हणजे आपल्या शरिरांतील फाजील शक्तीला बाहेर पडण्यासाठीं करून दिलेली वाट होय, " असें एक ग्रंथकार म्हणत होता, तर लागलीच मेलब्रॅांक आणि कार्लेग्रूज सारखे विद्वान आचार्य सांगत होते -- " छे ! छे ! खेळ म्हणजे आयुष्यांतील कर्तव्याची पूर्वसिद्धता आहे. एखाद्या चेंडूशीं खेळणारें मांजराचें पिल्लू तुम्हीं पाहिलें नाहीं काय ? पुढील आयुष्यांत त्याला उंदीर मारायचे असतात त्याची ही पूर्वसिद्धता. बाहुलीचा खेळ खेळणाऱ्या मुली तुम्ही पाहिल्या असतील. त्यांना पुढील आयुष्यात मातृपदाची जबाबदारी पार पाडायची असते त्याची पूर्वसिद्धता म्हणजे तो बाहुलीचा खेळ. "

पूर्वसिद्धतेचा हा सिद्धान्त मान्य करावा तोंच स्टॅन्ले हॉलसारखे पंडित गर्जून सांगत— " खेळ म्हणजे पूर्वस्मृतीचें दृश्य स्वरूप. शिकारीचा खेळ खेळणारी मुलें तुम्हीं पाहिली नाहींत ? हजारो वर्षांपूर्वी मानव प्राणी शिकारीवर उपजीविका

करीत होता. त्या पूर्वस्मृतीचें दृश्य स्वरूप म्हणजे मुलांचा तो शिकारीचा खेळ. किड्या–मुंग्यांना कांटे टोचणारीं अगर फुलपाखरांचीं पंखें तोडणारीं मुलें तुम्हीं पाहिलींच असतील. हजारो वर्षांपूर्वींच्या रानटी मानवी जीवनाची स्मृति म्हणजे मुलांचे हे खेळ."

खेळासंबंधीं विचार करून काढलेले हे सगळेच तात्विक सिद्धान्त कदाचित् बरोबरही असूं शकतील; पण माझ्या प्रश्नाचें समाधान या सिद्धान्तांनीं झालें नाहीं खास.

त्यानंतर एके दिवशीं विचार करीत बसलों असतां माझें एक मन [ मी त्याला आता ' माझें शास्त्रज्ञ मन ' असें म्हणतों ] मला तिऱ्हाइताच्या गंभीरपणानें विचारीत होतें– " हं, काय आहे तुमचा प्रश्न ? काम करतांना मनाला थकवा कां वाटतो, आणि खेळतांना मनाला उल्हास कां वाटतो, असाच ना ? काम कशाला म्हणतात? कामाचीं लक्षणें कोणतीं? या प्रश्नांचीं उत्तरें अगोदर निश्चित करा आणि त्या उत्तरांत तुमच्या प्रश्नाचेंहि उत्तर सामावलेलें आहे कीं नाहीं हें पहा."

खेळाचीं आणि कामाचीं लक्षणें ठरवितांना कोणतीं गाष्ट प्रामुख्यानें आपल्या नजरेसमोर येते ? खेळ हा आपण खेळाकरितांच खेळत असतों. काम करतांना आपला कांहींतरी हेतु ( बहुतांशीं स्वार्थी हेतु ) असतो; मग तो हेतु पैसा मिळ· विणें हा असेल अगर अन्य कोणताहि असेल. खेळानेंहि कुणाला पैसे मिळत असतील. पण पैसे मिळविण्याकरितांच खेळाडू

क्रीडांगणात उतरतो असें म्हणतां यावयाचें नाही. ज्यांच्या बाबतींत असें खात्रीनें म्हणतां येईल ते खेळाडूच नव्हेत– ते धंदेवाईक, ते कामकरी.

दुसरी महत्वाची गोष्ट अशी, कीं खेळांत आपण स्वतंत्र असतों. अर्थात् खेळाचीं म्हणून कांहीं बंधनें असतात आणि खेळतांना तीं बंधनें पाळावीं लागतात ही गोष्ट खरी. उदाहरणार्थ, क्रिकेट खेळायचें म्हणजे त्या खेळाचे नियम पाळले पाहिजेत हें खरें. पण मला क्रिकेट खेळायचें नाहीं आणि नियमहि पाळायचे नाहींत हें ठरविण्याइतकें स्वातंत्र्य मला खास आहे. माझ्या कामासंबंधीं मात्र मला हें स्वातंत्र्य नाहीं. मला कचेरींतहि जायचें नाहीं आणि कामहि करायचें नाहीं असें म्हणून चालायचें नाहीं. परिस्थितीनें माझें स्वातंत्र्य पार हिसकावून घेतलें आहे.

मात्र क्रीडाविषयांत माझी परिस्थिति माझ्या स्वातंत्र्याच्या आड येऊं शकत नाहीं. दुसरें असें, कीं आमच्या क्रिकेट-क्लबानें क्रिकेटचे नियमच अजिबात बदलण्याचें ठरविलें तरी आम्हांला कोण विचारणार ? ज्या वेळीं दुसऱ्या पक्षाबरोबर सामना देण्याचा प्रसंग येईल त्या वेळीं प्रश्न उद्भवेल; पण दुसऱ्या पक्षानेंहि आमचे बदललेले नियम मान्य केले कीं प्रश्न मिटलाच. म्हणजे असें, कीं खेळाचे नियम हे आमचे दास आहेत– आम्ही त्यांचे दास नाहीं.

तिसरी महत्वाची गोष्ट अशी, कीं खेळतांना आपलें अंत-

रंग खुलतें- कामाचे मात्र आपल्याला ओझें वाटतें. उदाहरणार्थ, एखादी कादंबरी करमणुकीस्तव अथवा मजेखातर आपण केव्हाच वाचून मोकळे होतों, पण तीच कादंबरी जर परिक्षेसाठीं नेमलेली असेल तर तिचें वाचन ओझ्यासारखें जड वाटेल.

या सर्व गोष्टींचा संयुक्त परिणाम म्हणजे खेळतांना मनाला उल्हास वाटतो आणि काम करतांना मनाला थकवा येतो.

पण सर्वच खेळ उल्हासदायक असतात कां ? सर्वच काम कंटाळवाणें असतें कां ?

क्रीडांगणावरील मनसोक्त विहार हें एक टोक झालें आणि बंदिगृहांतील सक्तमजुरीचें आणि खडीफोडीचें काम हें दुसरें टोंक झालें. या दोन टोंकांच्या मध्यें केवढें तरी जग पसरलेलें आहे, आणि या मधल्या जगांतील कितीतरी गोष्टींना काम म्हणावें कीं खेळ म्हणावें याचाच चटकन् उलगडा होणार नाहीं. उदाहरणार्थ, शिवाजी महाराजानीं स्वराज्य स्थापनेचा जो प्रचंड उद्योग केला त्याला काम म्हणावें कीं खेळ म्हणावें ? काम म्हणावें तर त्यांच्यावर तो उद्योग करण्याची सक्ति कुणीच केलेली नव्हती ? किंवा तो उद्योग करतांना त्यांचा कांहीं स्वार्थी हेतु होता असेंहि नाहीं. बरे, खेळ म्हणावें तर क्रीडांगण कुठें होतें ? मनसोक्त विहार करण्याचें स्वातंत्र्य तरी कुठें होतें ?

अशा तऱ्हेचीं कोडीं उलगडण्याचें एक निश्चित गमक आहे. अशा वेळीं आपण असा प्रश्न विचारावा–त्या त्या उद्योगांत कर्त्याचें अंतरंग खुललें होतें का? त्या त्या उद्योगांत कर्त्याला आनंद वाटत होता कां? त्या उद्योगांत कर्त्याचें अंतरंग खुललें असेल, कर्त्याला आनंद वाटला असेल, तर त्या उद्योगाला ‘ खेळ ’ हीच संज्ञा योग्य होय.

आणि हें गमक लक्षांत ठेवून आपण चट्कन् उत्तर देऊं–शिवाजीमहाराजांचा स्वराज्यस्थापनेचा प्रचंड उद्योग म्हणजे एक मोठा खेळ होता. सुएझचा कालवा हा लेसेप्सचा खेळच होता. रोमचा इतिहास हा गिबनचा खेळच होता. हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या म्हणजे त्यांचा खेळच. चित्तरंजन दासांचा त्याग हा त्यांचा खेळच. तुकारामांचें वैराग्य हासुद्धां त्यांचा खेळच. किंबहुना आपण असेंहि म्हणूं–**कामाचा खेळ केल्यानेंच खरें काम होतें.**

दुसऱ्या दिवशीं मीं कचेरीस गेलों तेव्हां नोकरीच्या राजीनाम्यासंबंधींचे माझे विचार साफ वितळून गेले होते. कचेरींतील माझ्या टेबलाशीं जातांच मीं टेबलावर लिहून ठेवले **जग म्हणजे फुलाबाग नव्हे, समरभूमीहि नव्हे, तर जग म्हणजे एक मोठें क्रीडांगण आहे.**



## ' बापकी बेटी ? '        : :– ६

नवें अन् जुनें, सनातनी अन् सुधारक, या दोन आगगाड्यांची टक्कर आतां सभांच्या स्टेशनांतच नव्हे, तर घरोघरींच्या लाइन्सवर देखील होऊं लागली आहे. प्रत्येक मासिकांत, प्रत्येक वर्तमानपत्रांत आजला हा वाद चालू ! जशी कांहीं सांथ उठली आहे ! त्यामुळं झालंय् काय, कीं या वादानं कोणत्या घरांत कोण ' लागतो ' याचा अदमासच करतां येईनासा झाला आहे.

वस्तुस्थिती तर अशा प्रकारची. अन् वासुकाकाचें घर कशा तऱ्हेचें म्हणाल तर घरीं स्वत: वासुकाका अगदीं जुन्या मताचे. पण चांगले व्यावहारिक हं. त्यांची ' ती ' तर थेट ' तिकड 'चा नमुना, पण त्यांची मुलगी–नांव जुन्यापैकींच होतं-म्हणजे कमल मात्र मॅट्रिक पास होऊन कॉलेजांत जाऊं लागलेली !—

तुम्ही म्हणाल वासुकाका जुन्या मताचे होते तर मग त्यांनीं मुलीला एवढें शिक्षण दिलें तरी कसें ? पण तुम्ही विसरतां कीं ते व्यवहारी होते. सधन आणि सुशिक्षित जांवई

मिळविण्यासाठीं त्यांनीं शिक्षणाचें आमिष लावलें होतें नुसतें. हें एक कारण. शिवाय मुलगी होती एकुलती एक. म्हणजे त्यांना मुलगा नव्हता असा नाहीं याचा अर्थ. एक सोडून दोन मुलगे होते त्यांना पण मुलगी म्हणजे ही एकटीच, शिवाय सगळ्यांत लहान. शेंडेफळ कीं कायसंसं म्हणतात नाहीं याला? -- म्हणून बापाची लाडकी. तेव्हां घरीं लग्नाचा प्रश्न निघाला कीं, तिनें म्हणावें, " मला नाहीं इतक्यांत लग्न करायचं. मीं नाहीं शाळा सोडायची. " अन् मुद्दाम फुगाविलेल्या गालांतून हे उद्गार निघाल्यावर बापाचें हृदय तें कसें विरघळल्यावांचून राहील ? त्यांतून वासुकाकांचे हृदय म्हणजे नुसता लोण्याचा गोळा. भावनेची थोडीशी आंच लागली तरी विरघळून पाणी व्हायचें त्याचें.

घरीं लग्नाची गोष्ट निघाली कीं, त्या गोष्टीला मोडता घालायचा कमलनें, असा आजपर्यंतचा रिवाज. पण आज वासुकाका कचेरींतून परत येतात न येतात तोंच जेव्हां कमलनें-- म्हणजे प्रत्यक्ष कमलनें नव्हे, तिच्या आईनें-- सांगितलें कीं, कमल लग्नाला तयार आहे, एवढेंच नव्हे तर तिनें 'नवरा' सुद्धां पाहिला आहे, 'पाहिला आहे' काय? त्याला लग्नाचें वचनही दिलें आहे,— मुद्द्याची गोष्ट तर पुढेंच आहे.- अन् हे नवरदेव नामें राजश्री तिची 'मागणी' घालावयाला आज साडेपांच वाजतां येणार आहेत. तेव्हां ....

हेन्री फोर्डनें आपल्या कारखान्यांतलीं सर्व यंत्रें आप-

त्याच डोक्यांत आणून बसविलीं, लंडनमधील सर्व आगगाड्यां-च्या वाहतुकी आपल्याच डोक्यांत सुरू झाल्या, कीं हिटलरचीं सर्व विमानें आपल्याच डोक्यांत सैरावैरा उडूं लागलीं हें वासुकाकांना कळेना. त्यांच्या अंगांतलें रक्त शर्यतींतल्या मोटारीप्रमाणें भरधांव वाहूं लागलें. मुलगी 'पहायची' कां मुलगा 'पहायचा'? लग्नाचें वचन! मागणी! शब्द नव्हते ते. प्रत्यक्ष बॉंबगोळे!

वासुकाका व्यवहारी म्हणून तर त्या बॉंबगोळ्यांच्या स्फोटांतून जिवत बाहेर पडले. त्यांच्या जागीं दुसरा कुणी असतां तर ठिकऱ्या उडाल्या असत्या त्याच्या.

साडेपांचचे ठोके पडले!

आणि त्या मागणीवाल्या तरुणाचें पाऊल वासुकाकां-च्या घरीं पडलें. हिंदू लोक अनियमित आहेत असं त्या वेळीं तरी कुणालाच वाटलं नसतं. पण कमल मात्र मनांतल्या मनांत म्हणाली असावी—'नियमितपणाची संवय नाहीं कांहीं यांना. पण प्रेम अनियमित लोकांना नियमित करतं अन् नियमित लोकांना अनियमित करतं.'

त्या तरुणाचा चेहरा वासुकाकांना ओळखीचा वाटला. पण त्यांना नक्की कांहीं आठवेना. त्याला पहातांच त्यांच्या डोक्यांत विचार मात्र चमकून गेला—'काय ऐटबाज आहे बेटा!—'

त्यांना असें कां वाटूं नये? तो ब्लेझरचा कोट, तो

रेशमी शर्ट, तीं तलम धोतरें, तो बाटा— बूट....कपड्यांतच नव्हे तर वागण्यांतही ऐटबाजपणा होता त्याच्या. आणि शिक्षण ? त्यानें आपल्या नांवाचें जें छापील कार्ड बासुकाकांच्या हातीं दिलें त्यावर चक्क छापलेंच होतें—

विश्वनाथ डी. धोपेश्वरकर
बी. एस्सी.

तो तरुण माडीवर आला. खुर्चीवर बसला. तरी बिचाऱ्या बासुकाकांची भोळी आशा त्यांना सांगत होती कीं, तो गृहस्थ कांहीं ' मागणी ' घालण्याकरतां आला नसावा. व्यवहारी मनुष्याला देखील आशा केव्हां केव्हां फसविते हेंच खरें.

पण हा आशा—तंतुही अखेर तुटला, आणि त्या राजश्रीनें ' मागणी ' तर घातलीच.

बासुकाकांनीं एवढेंच उत्तर दिलें.— " प्रश्न फार महत्वाचा आहे. दोन व्यक्तींच्या सर्व आयुष्याचा प्रश्न आहे हा. मला यांतली कांहींच माहिती नाहीं. प्रेम वगैरे जें कांहीं आपण म्हणतां त्याचीं वर्णनं आम्हीं क्वचित् कादंबऱ्यांतून वाचलेलीं. आमच्या आयुष्यांत हे प्रकार कधींच घडून आले नाहींत. तेव्हां मला विचाराला थोडा अवधि द्या. मी आपणांस दोन दिवसांत काय तें कळवीन.'

तरुणाच्या कामाचा निकाल लागलाच होता. आतां फक्त चहा तेवढा यायचा होता. अन् तोहि लागलीच आलाच,

अगदीं कमलनें आणला. त्याला आनंद वाटला आणि थोडें बाईटही वाटलें. एक कुशंकाही त्याच्या मनास चाटून गेली– ' हा वृद्ध कपि आपलं हाताशीं आलेलं सौख्य हिरावून तर नेणार नाहीं ना ? '

चहा झाल्यावर तो तरुण बाहेर पडला आणि रस्त्याला लागला. तो गेल्यावर कमल वासुकाकांच्या जवळ आली. अन् त्यांना कायसेंसें विचारूं लागली. वासुकाका एकदम तिच्या अंगावर खेंकसले. कांहीं झालं तरी जुन्या तऱ्हेचे वडील होते ते. पण मुलगी आधुनिक तऱ्हेची होती ना ? पण तऱ्हेवाईकपणाच्या असल्या लहरी आपल्या बापाला मधून मधून येतात हें तिला माहीत असल्यानें वितंडवादाच्या नादीं न लागतां ती आपल्या खोलींत जाऊन बसली आणि विचार-मग्न झाली. शेवटीं तिनें निर्धार केला– " आपल्या सनातनी वडिलांनीं किती जरी मोडता घातला तरी आपण आपल्या निश्चयापासून तिळभरहि मागं फिरायचं नाहीं. बाबा हट्टाला पेटले तर आपण त्यांचं घर सोडून जाऊं. विश्वनाथराव चांगले श्रीमंत आहेत. राजाराणीसारखे राहूं आपण. "

चटकन् तिला कसलीशी आठवण झाली तिनें आपल्या टेबलाचा खण उघडला. कित्ती कित्ती तरी जमती होत्या त्यांत. रिस्टवॉच, फाउन्टन्पेन, रेशमी हातरुमाल, अत्तराच्या बाटल्या, फोटो फ्रेमी--त्या साऱ्या वस्तु तिला भेट म्हणून ज्यानें दिल्या होत्या त्याच्या चिंतनांत ती लागलीच मग्न होऊन गेली.

इकडे वासुकाका डोकें खाजवून त्या तरुणाची ओळख आपल्या स्मृतिपटलावर कुठें सांपडते कीं काय, याचा शोध घेत होते. एखादा शब्द अगदीं जिभेवर असावा पण ऐनवेळीं तो आठवूं नये, अशा वेळीं आपल्यास जसें होतें, तसें त्यांना झालें होतें ! किंवा आपण सिनेमा पाहून खोलींत यावें, आणि दिवा लावण्यासाठीं काड्याची पेटी पहावी, तों ती कुठें सांपडूं नये; पेटी ठेवण्याचीं ठरलेलीं ठिकाणें तीनदां पाहूनही पेटीचा पत्ता लागूं नये, अशा वेळीं जशी मनाची स्थिती होते, तशी वासुकाकांच्या मनाची स्थिती झाली होती.

तेव्हां ज्या वेळीं त्यांना ती ओळख गवसली तेव्हां त्यांना किती आनंद झाला असेल ? क्षणमात्र आपली परिस्थिति ते विसरूनच गेले. पण परिस्थितीनें त्यांना विसरून जायला हवं ना ? तें कुठं घडून येतं ? अखेर वसुकाकांना भानावर यावेंच लागलें.

त्यानंतर बराच वेळ ते या गोष्टीचा विचार करीत होते. ' पोरटी तामसी आहे. हट्टी आहे. लाडांत वाढलेली आहे. आपलं खरं केल्याखेरीज रहायची नाहीं. सधन जांवई मिळावा म्हणून पोरीच्या शिक्षणावर पैसा खर्च केला अन् अखेर तिला हे भिकेचे डोहाळे आठवले. समजावून सांगणं आपलं कर्तव्य आहे. ऐकायची नाहींच ती. एवढा आज्ञाधारकपणा कुठला आलाय् अलीकडच्या पोरांत ! पण समजावून सांगणं आपलं कर्तव्य आहे. मग ती जाणें अन् तिचं

नशीब जाणें!'

त्यांनीं हाक मारली, 'कमल!'

थोड्या वेळानें कमल त्यांच्या खोलींत आली.

'कमल,' वासुकाका म्हणाले. "कमल, तूं शहाणी आहेस. सुशिक्षित आहेस. तुला सांगावं असं नाहीं. पण एक-दोन गोष्टी तुला सांगितल्याखेरीज रहावत नाहींत म्हणून सांगतों. पहिली गोष्ट अशी कीं ज्याच्याशीं तूं लग्न करण्यास तयार झाली आहेस तो तरुण मुळींच श्रीमंत नाहीं...."

'काय म्हणतां दादा तुम्ही?'

'ज्याच्याशीं तूं लग्न करणार आहेस तो मनुष्य कंगाल आहे.'

'मग त्यांचा....'

'तूं काय बोलणार तें समजलं. त्याचा तो सारा थाट त्याच्या मामाच्या मेहेरबानीवर चाललेला आहे. त्याचा मामा मोठा इंजिनिअर आहे. तो त्याला पैसे पाठवितो. पण त्या मामाला स्वतःचीं मुलं आहेतच. तो याला जन्मभर पैसे थोडेच पुरविणार आहे? हा स्वतः पुरा कंगाल आहे. आतां बी. एस्‌सी. ची पदवी त्याच्याजवळ आहे हें मला कबूल आहे, पण या दिवसांत त्या पदवीला किती महत्व द्यायचं हें मी तुला सांगयला पाहिजे असं नाहीं. दुसरी गोष्ट अशी कीं....'

'पुरे दादा. आतां एक अक्षरहि जास्त सांगूं नका. मला त्यांनीं ही हकीगत कधींच सांगितली नाहीं. मला

त्यांनीं फसविलं! त्यांच्याबरोबर मीं कध्धीं लग्न करणार नाहीं. पुरुष मेले....'

त्यानंतरचे ते ओघळणारे अश्रु अन् एकदम 'एक्झिट'.

आश्चर्यचकित होण्याची पाळी आतां बासुकाकावर आली होती. पण आश्चर्याच्या लहरी किंचित् ओसरल्यावर ते स्वत:शींच उद्गारले--

' तरीच म्हटलं माझी मुलगी आहे ! '



## मतप्रचार :- ७

विधिमंडळाच्या निवडणुकीची दंगल आतां समाप्त झालेली आहे. जनतेनें विधिमंडळात जावयाचे आपले प्रति-निधि निवडून दिले आहेत हिंदुस्तानांतील बहुतेक प्रांतांच्या विधिमंडळांमधून राष्ट्रीय सभेच्या उमेदवारांचेंच बहुमत झालेलें आहे. पण हें बहुमत राष्ट्रीय सभेला सुखासुखी मिळालेलें नाहीं. हें बहुमत मिळविण्यासाठीं तिला मोठा मतप्रचार करावा लागला. द्रव्य खर्चावें लागलें. राष्ट्रीय सभेच्या मोठ्या पुढाऱ्यांना दौरे काढावें लागलें. राष्ट्रीय सभेच्या स्वयंसेवकांना घरोघर जाऊन लोकांची मनें वळवावीं लागलीं. राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांना मोठमोठ्या सभा भरवाव्या लागल्या, व्याख्यानें द्यावीं लागलीं, मिरवणुकीं काढाव्या लागल्या, वर्त-मानपत्रांतून लेख लिहावे लागले आणि प्रसिद्धीकरण करावें लागलें. या सर्वच गोष्टींचा परिणाम होऊन लोकांचीं मनें वळलीं आणि लोकांनीं राष्ट्रीय सभेच्या उमेदवारांना निवडून दिलें. राष्ट्रीय सभेच्या निवडणुकीच्या बाबतींतल्या यशाची गुरुकिल्ली म्हणजे तिनें केलेला प्रभावी मतप्रचारच होय. राष्ट्रीय सभेचा

स्वार्थत्याग हाहि कांहीं अंशीं त्या यशास कारणीभूत झाला ही गोष्ट खरी आहे. पण त्या स्वार्थत्यागाची माहिती प्रचाराच्या द्वारें जनतेला करून दिली गेली नसती तर प्रस्तुत यश तिला मिळालें असतेंच असें म्हणवत नाहीं.

औषधांचा खप व्हावा किंवा मालाचा उठाव व्हावा, म्हणून दिलेल्या जाहिराती म्हणजे मतप्रचार नव्हे. मताचा अगर तत्वाचा प्रचार करून लोकांचीं मतें त्या मतांस अगर तत्वास अनुकूल करून घेणें या अर्थानें मतप्रचार हा शब्द वापरला जातो. एकट्यादुकट्यानें केलेला मतप्रचार प्रभावी होऊं शकत नाहीं. शिस्त, संघटना, या गुणांनी युक्त असाच मतप्रचार प्रभावी असतो.

प्राचीन कालापासून लोकांचीं मनें वळविण्याचे उपक्रम झालेले आहेत. म्हणजे प्राचीन कालापासून मतप्रचाराची प्रथा चालू आहे.

## आर्यावर्तांतील मतप्रचाराचा थोडा इतिहास.

जीं मतें किंवा तत्वें जनतेला मान्य झालेलीं असतात, ज्या मतांची पकड जनतेच्या मनावर पूर्णपणें बसलेली असते, त्या मतांचा प्रचार करण्याची फारशी जरूरच नसते. जीं मतें नवीन आहेत, जनतेच्या परिचयाचीं नाहींत, ज्या मतांचें दुरून दर्शन झालें तरी जनता बिचकते, अशा मताच्या प्रसारासाठीं मतप्रचाराची योजना करावी लागते.

आर्यावर्तांतील पहिला प्रभावी मतप्रचार बौद्ध लोकांनीं

केला. सम्राट अशोकाच्या कारकीर्दींत बौद्ध भिक्षु आणि भिक्षुणी यांचे संघ मतप्रचारार्थ देशोदेशीं रवाना झाले. बौद्धांच्या टोलेजंग सभा भरूं लागल्या. या प्रभावी मतप्रचाराचा योग्य तो परिणाम झालाच. थोड्याच कालावधींत आर्यावर्त बौद्धमय होऊन गेला.

आर्यावर्तांतील दुसरा प्रभावी मतप्रचार आद्य शंकराचार्यांनीं आणि त्यांच्या शिष्यांनीं केला. शंकराचार्यांनीं आर्यावर्ताच्या चारी दिशांना मठ स्थापिले. आणि आचार्यांचे अनेक अनुयायी बौद्धधर्माचा पाडाव करीत आणि वेदांत मताचा प्रचार करित हिंडू लागले. पण मतप्रचाराचें महत्त्व जसें बौद्ध लोकांना समजलें होतें, तसें हिंदू लोकांना समजलें नाहीं, असें म्हणावें लागतें. कारण स्वमत प्रचारार्थ बौद्धांनीं जसे परदेशांतहि भिक्षुसंघ रवाना केले तसें हिंदूंनीं मात्र संन्याशांचे संघ परदेशांत पाठविलेले प्राचीन इतिहासांत तरी दिसून येत नाहींत.

फक्त महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें झालें, तर महाराष्ट्रांतील पहिला प्रभावी मतप्रचार ज्ञानदेव-नामदेवादि संतांनींच केला असें म्हणावें लागतें. त्यांच्या कालांत भागवत धर्म किंवा भक्तिमार्ग जनतेच्या परिचयाचा नव्हता. वेदान्ताची छाप जनतेच्या मनावर अढळ होती. ज्ञानदेव-नामदेव यांच्या प्रवचन-कीर्तनादिकांनीं ती छाप पहिल्यांदा चाळविली. आणि पुढें तुकाराम-रामदासादि भागवतांनीं भक्तिमार्गाची छाप जन-

तेच्या मनावर अढळ ठेवून दिली. आजही भागवत धर्माची छाप मराठी जनतेच्या मनावर केवढी आहे, याचें प्रत्यंतर आषाढी-कार्तिकीच्या निमित्तानें ज्या लक्षावधि लोकांचा मेळा पंढरपुरीं जमतो, त्यावरून सहज पटण्यासारखें आहे.

आर्यावर्ताची प्रकृति निवृत्तिपर असल्यानें धर्म हाच विषय येथें मतप्रचाराचा मुख्य विषय म्हणून राहिला. पण एकोणिसाव्या शतकांत इंग्रजांचें राज्य झाल्यावर हिंदु संस्कृति पाश्चात्य संस्कृतीच्या सहवासांत आली. या सहवासाचा एक परिणाम असा झाला, कीं राजकारण हा देखील मतप्रचाराचा महत्वाचा विषय होऊन बसला. राष्ट्रीय सभेचा पक्ष, प्रागतिक पक्ष, लोकशाही स्वराज्यपक्ष, इत्यादि राजकारणाच्या आखाड्यांतील निरनिराळे पक्ष व त्या पक्षांनीं केलेला आपापल्या मतांचा प्रचार हे सर्वांच्या परिचयाचे आहेतच. राजकारण मतप्रचाराचा विषय होऊन बसलें तरी मतप्रचाराच्या दृष्टीनें धर्माचें महत्व कांहींच कमी झालें नाहीं. गेल्या शतकांत आर्यावर्तात आर्यसमाज, प्रार्थनासमाज, ब्रम्होसमाज, हे धार्मिक समाज ऊर्फ पंथ कसे निर्माण झाले आणि त्या पंथांनीं आपापल्या मतांचा प्रचार कसा केला हें विस्तारानें सांगण्याची मुळींच जरूर नाहीं. मुद्दा एवढाच, कीं मतप्रचाराच्या दृष्टीनें हिंदुस्थानांत तरी धर्माचें महत्व कांहींच कमी झालेलें नाहीं.

### ग्रीक आणि रोमन लोकांतील मतप्रचार.

पाश्चात्य राष्ट्रें आरंभापासूनच प्रवृत्तिपर प्रकृतीचीं

असल्यानें राजकारण हा त्यांचा मतप्रचाराचा मुख्य विषय आणि धर्म हा दुय्यम विषय झालेला आहे. हिंदु लोकांच्या-प्रमाणें ग्रीक आणि रोमन लोकांतहि प्रत्यक्ष बोलली जाणारी भाषा हेंच मतप्रचाराचें मुख्य साधन असें. वक्तृत्व हा विषय ग्रीक विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमांत समाविष्ट केलेला होता. वक्तृत्व हेंच चळवळीचें आणि मतप्रचाराचें मुख्य साधन होतें. वक्तृत्वाच्या खालोखाल ग्रीक लोकांतील मतप्रचाराचें महत्वाचें साधन म्हणजे नाटक हें होय. ॲरिस्टॉफेनिसनें आपली 'शांतता' 'सरदार लोक' इत्यादि नाटकें ऑलिंपिक सामन्यानिमित्त जे हजारों लोक जमत त्यांच्यापुढें केली. वक्तृत्व हेंच मतप्रचाराचें साधन रोमन लोकांतहि राहिलें. सिसरोसारख्या वक्त्यांनीं मतप्रचारासाठीं याच साधनाचा उपयोग केला. वक्तृत्वाशिवाय पत्रक हें एक दुसरें साधन रोमन लोकांनीं मतप्रचाराच्या कामीं उपयोगांत आणिलें. निरनिराळ्या मुत्सद्यांनीं आपल्या मतांच्या पुष्ट्यर्थ पत्रकांच्या प्रतीं लिहवून वाटलेल्या होत्या. पॉंपे शहरांतील भिंतींवरून उमेदवारांना निवडून देण्याबद्दल जाहिराती देखील चिकटवलेल्या असत, हें वर्णन वाचतांच आपल्याला आजकालच्या निवडणुकींतील मतप्रचाराची आठवण झाल्याखेरीज रहात नाहीं.

## मध्ययुगांतील मतप्रचार.

रोमन राष्ट्राचें पतन झाल्यावर युरोपांत लहानसहान

जमावांचेंच प्राबल्य झालें; निरक्षरता वाढली; लोकसत्ता लयाला गेली. त्यामुळें मतप्रचाराच्या साधनांत या कालांत म्हणण्याजोगी कांही भर पडली.

मध्ययुगाच्या शेवटीं मात्र मतप्रचाराच्या साधनांत एक महत्वाची भर पडली. आणि ती भर पडण्यास छापण्याची कला हीच कारणीभूत झाली. त्या कालांत पोपच्या जुलमाविरुद्ध चळवळ सुरू होती. आणि त्या चळवळींतील वादी मार्टिन ल्यूथर आणि त्याचे अनुयायी, व प्रतिवादी पोप आणि त्याचे अनुयायी यानीं छापील पत्रकरूपी मतप्रचाराच्या नव्या साधनाचा पुष्कळ उपयोग करून घेतला. विशेषतः या पत्रकांच्या योगानें मार्टिन ल्यूथरचें नांव दूरवर ऐकूं जाऊं लागलें. या कालांतच मतप्रचार जिच्यासाठीं आणि जिच्यामध्यें करावयाचा ती सामान्य जनता जागी झालेली दिसून येऊं लागली.

## आधुनिक युरोपांतील मतप्रचार.

युरोपांत पत्रकांचा उपयोग पहिल्यापहिल्यानें धार्मिक मतप्रचारासाठीं जरी करण्यांत आला, तरी लौकरच त्या पत्रकांचा उपयोग राजकीय मतप्रचारासाठींहि होऊं लागला. इंग्लंडमध्यें सतराव्या शतकांत ज्या राजकीय घडामोडी झाल्या, त्यांतील पक्षोपपक्षांनीं छापील पत्रकांचा आणि 'वर्तमानपत्रां'चा मतप्रचारासाठीं बराच उपयोग करून घेतला. मतप्रचार करणारें पहिलें वर्तमानपत्र म्हणून "मॉडरेट" वर्तमानपत्राच्या नांवाला वर्तमानपत्रांच्या जगांत आजहि मान मिळतो. सन

१६९५ मध्यें इंग्लंडांत पत्रकांवरील व वर्तमानपत्रांवरील नियंत्रण बरेंच कमी झालें आणि त्या वेळेपासून मतप्रचाराचें एक जोरदार साधन म्हणून पत्रकें आणि वर्तमानपत्रें यांचा इंग्लंडमध्यें सर्रास उपयोग करून घेण्यांत येऊं लागला.

फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वीची फ्रान्समधील लोकपक्षाची चळवळ मुख्यतः राजकीय पत्रकांवरच आधारलेली होती. सन १७८९ सालाच्या सुरवातीस फ्रेंच राजकीय पत्रकांवरील नियंत्रण पुष्कळच कमी झालें आणि त्याबरोबर पॅरिसमधील अधीर जनता पत्रकारांच्या हातांतील एक बलाढ्य आणि भयंकर शस्त्र होऊन बसली. रूसो, व्हॉल्टेअर इत्यादि पत्रपंडितांनीं या परिस्थितीचा फायदा कसा करून घेतला हें या ठिकाणीं विस्तारानें सांगण्याची मुळींच जरूर नाहीं. मात्र त्या वेळेपासून वर्तमानपत्रांशीं फटकून वागून कोणाहि सत्ताधिशाला आपली सत्ता कायम ठेवतां येणार नाहीं हें तत्त्व पूर्णपणें सिद्ध झालें.

एकोणिसाव्या शतकांतील नेपोलिअन, मेटरनिच, बिस्मार्क, यांसारख्या राज्यकार्यधुरंधरांनीं प्रस्तुत साधन आपल्या हाताशीं जय्यत तयार ठेवलेलें होतें. जनतेमध्यें आपल्या कार्याबद्दल आदर आणि आपल्या शत्रूंबद्दल द्वेष निर्माण करण्यासाठीं आणि तो वाढविण्यासाठीं ते मुत्सद्दी या साधनाचा उपयोग करीत. नेपोलिअननें आपल्याविरुद्ध प्रचार करणाऱ्या एका प्रसिद्ध इंग्रजी वर्तमानपत्राचें तोंड सोन्याचा गोळा बस-

वून कांहीं काळ बंद ठेवलेलें होतें हा प्रवाद प्रसिद्धच आहे.

## विसाव्या शतकांतील मतप्रचार.

विसाव्या शतकांत मतप्रचाराच्या साधनांत झपाट्यानें भर पडत चालली आहे. वर्तमानपत्रें, बोलपट, रेडिओ, नाटकें, यांच्या जोडीला वाङमयाचाहि उपयोग मतप्रचाराच्या कामीं केला जात आहे. ख्रिस्तवासी गॉल्सवर्दी, बर्नार्ड शॉ, सिंक्लेअर, एच्. जी. वेल्स, इत्यादि जगप्रसिद्ध लेखक उघडउघड मतप्रचार करीत आहेत. 'कलाविकासाच्या हेतूनें आपण एकहि ओळ खरडली नसती!' हें बर्नार्ड शॉचें विधान प्रसिद्धच आहे.

मतप्रचाराचीं साधनें वाढलीं, त्याचप्रमाणें विषयहि वाढले. पूर्वीच्या काळीं धर्म आणि राजकारण हेच काय ते संघटित आणि शिस्तवार मतप्रचाराचे मुख्य विषय होते. सध्यां हे दोन विषय तर आहेतच; शिवाय मद्यपानाच्या विरुद्ध मतप्रचार, अश्लील बोलपटांच्या विरुद्ध मतप्रचार, स्त्रियाच्या सुधारणेकरितां मतप्रचार, देशांदेशांतील स्नेह वाढावा एतदर्थ मतचप्रार, एखादी भाषा राष्ट्रभाषा व्हावी म्हणून मतचप्रार, असे कितीतरी मतप्रचार सुरू आहेत.

विसाव्या शतकांत मतप्रचाराचीं साधनें वाढलीं आहेत, मतप्रचाराचे विषय वाढले आहेत, त्याचप्रमाणें त्याचें महत्वहि वाढलेलें आहे. जर्मनी, इटली, रशिया, अमेरिका, जपान या आधुनिक कालांतील बलाढ्य राष्ट्रांकडे नजर टाकल्यास प्रस्तुत

विधानाची सत्यता तत्काळ पटणारी आहे. प्रसिद्ध जर्मन मंत्री डॉक्टर गोएबल्स याचें मुख्य काम नाझींचा मतप्रचार हेंच आहे. वर्तमानपत्रांवर नियंत्रण घालण्याचे कायदे करीत असतां त्यानें स्पष्टच बोलून दाखविलें कीं वाद्य जसें गायकाला हुकुमी सांथ देतें त्याप्रमाणें वर्तमानपत्रांनीं सरकारला हुकुमी सांथ दिली पाहिजे. स्टॅलिननें तर परवापर्यंत वर्तमानपत्रांना सरकारविरुद्ध ब्र काढण्याचीहि परवानगी दिली नव्हती. इटालींत सरकारविरुद्ध मतप्रचार करणाऱ्या वर्तमानपत्रांना संपुष्टांत आणलें गेलें आहे आणि सरकारच्या बाजूनें मत-प्रचार करणारीं पत्रें फोफावत आहेत. अमेरिकेच्या अध्यक्ष-पदासाठीं उभा रहाणारा उमेदवार केवढा मोठा मतप्रचार करीत असतो याची ख्याति जगभर पसरलेली आहेच.

## मतप्रचारावरील नियंत्रण.

मतप्रचार हा नेहमींच चांगल्या मतांचा किंवा तत्वांचा असतो असें मात्र नाहीं. कित्येक वेळां स्वार्थी लोकानीं स्वत:चा स्वार्थ साधण्यासाठीं खोट्या तत्वांचाहि प्रचार जोरानें चाल-विलेला असतो. विशेषत: जेव्हां युद्धाची वावटळ उठलेली असते, तेव्हां तर असल्या खोट्या मतांच्या प्रचाराला ऊतच येतो. गेल्या महायुद्धाच्या वेळीं आपल्या देशांतील सामान्य लोकांचें जर्मन लोकांविषयीं काय मत होतें हें वाचकांनीं या ठिकाणीं आठवण्याचा प्रयत्न करावा. जर्मन लोक म्हणजे इकडील सामान्य लोकांना रावण-कुंभकर्णादि राक्षसाचे

वंशजच वाटत असत. आपल्या देशांतील सामान्य लोकांची जर्मन लोकांच्याबद्दल ही जी कल्पना त्या वेळीं बनली तिला बहुतांशीं कारण म्हणजे तत्कालीन मतप्रचार हेंच होय. ‘ मदर इंडिया ’ या गाजलेल्या पुस्तकाची लेखिका मिस् मेयो हिनें चालविलेला मतप्रचार म्हणजे खोट्या मतांच्या प्रचा-राचें एक प्रातिनिधीक उदाहरण होय.

‘अशा प्रकारच्या खोट्यानाट्या मतांच्या प्रचारावर नियंत्रण कशानें घालतां येईल ’ या प्रश्नाचें उत्तर ‘कायद्यानें’ असेंच पुष्कळांना सुचेल. पण ही गोष्ट दिसते तितकी सोपी नाहीं. सांबाच्या पिंडीवर बसलेल्या विंचवाला मारतांहि येत नाहीं आणि जिवंतहि ठेवून चालत नाहीं; अशांपैकींच कांहींसा अनुभव प्रस्तुत बाबतींत कायदा करतांना येतो. दुष्ट मतप्रचारावर नियंत्रण घालण्याच्या शुद्ध हेतूनें किंवा निमि-त्तानें सत्ताधीशांनीं नागरिकांच्या मुद्रण-भाषण-स्वातंत्र्य या बहुमोल हक्कांवर गदा आणली आहे, असें इतिहास आपल्यास सांगतो. आज रशियामध्यें फॅसिझमचा मतप्रचार शक्य नाहीं. हिंदुस्थान तर काय बोलून चालून परतंत्र राष्ट्र. प्रस्तुत सरकारच्या हित संबंधाविरूद्ध कुठलाहि मतप्रचार हाणून पाडण्यास सरकार सदैव सज्ज. तेव्हां कायदारूपी हत्यार ज्या तऱ्हेनें आज वापरलें जातें ती तऱ्हा शिलक असे-तोंपर्यंत नागरिकांचा मुद्रण—भाषण—स्वातंत्र्याचा हक्क शाबूद ठेऊन अनिष्टमतप्रचाराचीच तेवढीं छाटणी करणें शक्य नाहीं

असें दिसून येईल.

बरें, आधुनिक मतप्रचारावर कायद्याचें कुठलेंच बंधन असूं नये असें म्हटलें तरी तिकडूनहि पंचाईत. कायद्याची बंधनें अजिबात सुटली कीं, मतप्रचाराचीं हीं बलाढ्य साधनें सर्व देशभर हवा तसा धुमाकूळ घातल्याखेरीज कधींहि स्वस्थ बसणार नाहींत. आणि ' भीक नको पण कुत्रा आवर ' अशी बिचाऱ्या नागरिकांचीं केविलवाणी स्थिती होऊन जाईल. वर्तमानपत्रांवर जबरदस्त नियंत्रण लादण्याच्या आपल्या धोरणाचें समर्थन करीत असतां मुसोलिनी म्हणाला होता—

' वर्तमानपत्रांवर नियंत्रण नसेल तर वर्तमानपत्रें फक्त आपल्या पाठीशीं असलेल्या भांडवलवाल्यांचें आणि बँकांचेंच तेवढें हित पहात रहातील आणि त्यांचेंच तेवढें प्रसिद्धीकरण करीत रहातील. ' या विधानाचा अर्थ एवढाच कीं वर्तमान–पत्रांवर नियंत्रण राहिलें नाहीं तर तीं कांहीं ठराविक कंपूच्या हिताचीच टिमकी बडवीत राहतील. आणि हें अगदीं स्वाभा-जिक आहे. म्हणच आहे, ' ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी. ' वर्तमानपत्रांना जे भांडवलवाले भांडवलाचा पुरवठा करतात, जे जाहिरातवाले जाहिरातींचा पुरवठा करतात त्यांच्याच हिताची घोषणा तीं करीत रहाणार. यायोगें देशां–तील बहुसंख्य लोकांचें कांहींच हित न होतां, झालें तर नुक–सानच होणार. तेव्हां वर्तमानपत्रांवर कायद्याचें नियंत्रण पाहिजे यांत शंका नाहीं.

मतप्रचारावर कायद्यानें नियंत्रण घालण्यांत अशा प्रकारचा दुहेरी पेंचप्रसंग आहे. पण या पेंचप्रसंगांतूनहि सुट॰ण्याचा एक मार्ग फरान्सनें काढलेला आहे. तो मार्ग अद्याप प्रयोगावस्थेंत आहे; तो पूर्णतेस पोंचला तर इतर राष्ट्रांना खरोखरीच तो फार उपयोगाचा होईल.

तो मार्ग कोणता? स्टेटस्मन पत्र म्हणतें—'फ्रेंच सरकार लौकरच विधिमंडळापुढें एक ठराव आणणार आहे. त्या ठरावाचा हेतु नागरिकांच्या भाषण–मुद्रण–स्वातंत्र्याला धक्का न लागतां, त्यांना वर्तमानपत्रांचा 'बोलाविता धनी कोण आहे,' हें कळण्यास मदत व्हावी हा आहे? त्या ठरावाचें रूपांतर कायद्यांत झाल्यास त्या कायद्यान्वयें वर्तमानपत्रांना आपल्या उत्पन्नाच्या बाबी, व त्या उत्पन्नाची विल्हेवाट, यासंबंधीं तपशील जाहीर करावा लागेल. अर्थात् कोणत्या वर्तमानपत्राचे हितसंबंध कुणाशी निगडीत झालेले आहेत याची स्पष्ट कल्पना नागरिकांना येईल आणि त्या वर्तमानपत्रांच्या मतप्रचारावर कितपत विश्वास ठेवावयाचा हें त्यांचें त्यांना ठरवितां येईल.

## मतप्रचाराचें महत्व

मतप्रचाराच्या अंगीं दोष असले तरी त्याचें महत्व यत्किंचित्‌हि कमी नाहीं. खवळलेली जनता, जागृत जनता, ही एक प्रचंड शक्ति आहे; आणि या शक्तीनें आजपर्यंत जगाच्या इतिहासाचा ओघ कित्येकदां बदललेला आहे. पण

जनतेचें जंगल उठविण्यास प्रभावी मतप्रचारासारखें रामबाण साधन अद्याप उपलब्ध झालेलें नाहीं. या एकाच साधनाच्या सहाय्यानें डेमॉस्थेनिस या विख्यात ग्रीक वक्त्यानें ग्रीसच्या राजधानीवर— अथेन्सवर— चालून येणाऱ्या फिलिप राजावर भडिमार उडवून दिला आणि ग्रीक लोकांना त्या राजास तोंड देण्यास उद्युक्त केलें. याच साधनानें रोमन राष्ट्रावर आलेल्या आपत्ति सिसरो या प्रसिद्ध रोमन वक्त्यानें नाहींशा केल्या. याच साधनानें बौद्ध आणि खिश्चिन लोकांनीं आपापले धर्म जगभर फैलावले. हेंच साधन फ्रेंच राज्यक्रांतीला कांहीं अंशीं कारणीभूत झालें. नेपोलिअन, बिस्मार्क, हिटलर, मुसोलिनी, स्टॅलिन, या सत्ताधीशांनीं आपल्या हातीं सत्ता ठेवण्यासाठीं याच साधनाचा सदैव उपयोग केला आहे. याच साधनाच्या सहाय्यानें राष्ट्रीय सभेनें आपला संदेश हिंदी जनतेच्या कानांवर घातला आणि याच साधनाच्या सहाय्यावर राष्ट्रीय सभेला पुढील स्वातंत्र्याचा झगडा लढावयाचा आहे.



रसेल आणि फिग्गीन

## स्त्री-बुद्धि : :— ८

उत्तर हिंदुस्थानांत एक छोटेसें संस्थान आहे. त्या संस्थानचे अधिपति वारले. त्यांच्या मागून त्यांचा आठ वर्षांचा मुलगा संस्थानाधिपति झाला. पण तो अल्पवयी असल्यानें ब्रिटिश—सरकारनें राज्याच्या कारभाराचीं सूत्रें त्याच्या हातीं न ठेवितां त्याच्या आईच्या-रीजंट राणीसरकारच्या हातीं ठेविलीं.

राज्यकारभाराची जबाबदारी राणीसरकारवर पडतांच एक कार्यतत्पर असा कारभारी नेमावा असें त्यांना वाटूं लागलें. थोड्याच दिवसांत जुन्या कारभाऱ्याला पेन्शन झालें. कारभाऱ्याची जागा रिकामी होतांच ती जागा भरण्याबद्दल अनेक अर्ज राणीसरकाराकडे आले. त्यांतील दोन अर्ज निवडून ते लिहिणाऱ्यांना मुलाखतीस बोलावण्यांत आलें.

अर्थातच ही वार्ता दरबारच्या नोकर मंडळींत पसरली. मुलाखतीस निवडलेल्या दोन गृहस्थांपैकीं एकानें खालसांतली आपली जबाबदारीची नोकरी उत्तम रीतीनें पार पाडली होती आणि त्यास नुक्तेच पेन्शन झालें होतें. दुसरे गृहस्थ अगदीं

तरुण होते आणि ते नुक्तेच विलायतेंतून परत आले होते. विलायती आचार-विचार त्यांच्या अंगीं पुरते मुरून गेले होते. संस्थानाचें बरेचसें भवितव्य ज्यांच्या हातीं असतें अशा एजंट-गव्हर्नर इत्यादि अधिकाऱ्यांना हे गृहस्थ सहज खूष करतील अशी सर्वांची कल्पना होती.

अशा तऱ्हेच्या दोन गृहस्थांपैकीं कारभारी म्हणून कुणाची निवड होते हा दरबारच्या नोकरमंडळींत अतिशय कुतुहलाचा विषय होऊन बसला होता. इतकेंच नव्हे तर याबद्दल पैजाहि लागल्या होत्या.

संध्याकाळची वेळ होती. मुलकी खात्यांतले दोन कारकून फिरावयास आले होते. अर्थात् संभाषणाचा विषय नव्या कारभाऱ्याची नेमणूक हा होता.

" प्रेमचंद, मी तुम्हाला सांगतों कीं त्या तरूण गृह-स्थाचीच या जागेवर निवडणूक होणार. " दुनीचंद म्हणाले.

" पण मी तुम्हाला सांगतों कीं, त्या अनुभवी गृह-स्थाचीच या जागेवर नेमणूक होणार. अहो सध्यां प्रसंग कसला आहे हें तुम्हीं लक्षांत घेत नाहीं. सध्यां कारभाराचें काम करायला अनुभवी माणसाचीच जरूर आहे. उगीच पोरासोरी कारभार करायला राणीसाहेबांना खूळ लागलं आहे कीं काय ? " प्रेमचंद म्हणाले.

" तुमचा तर्क अजिबात चुकीचा आहे. सध्यां जरूर आहे ती अनुभवी माणसाची नव्हे तर जबर काम करणाऱ्याची.

काम किती शिल्लक राहिलें आहे याची तुम्हांला कल्पना नाहीं. तुमचें तें म्हातारें खोड इथें काय करणार आहे ? शिवाय आणखी नाजूक गोष्ट तुम्ही लक्षात घेतली नाहीं. म्हटलं, सध्यां स्त्रीराज्य आहे. तेव्हां... " दुनीचंदानीं वाक्य पुरें केलें नाहीं. ते खदखद हसूं लागले. त्यांचा आशय अर्थात् प्रेमचंदांच्या लक्षात आला.

"दुनीचंद, उगीच तंटा कशाला ? आतां आपण एक पैजच लावूं. माझं मत असं आहे कीं, त्या अनुभवी गृहस्थाचीच कारभाऱ्याच्या जागीं नेमणूक होणार. माझं मत खोटं झालं तर मी तुम्हाला माझा एक महिन्याचा पगार देईन आणि तुमचं मत खोटं झालं तर तुम्ही एक महिन्याचा पगार मला दिला पाहिजे. आहे पसंत ही पैज ?"

"कबूल."

० ० ०

राणी सरकारची आणि भावी कारभाऱ्यांची खास मुलाखत होऊन संध्याकाळच्या पाच वाजण्याच्या आंतच कायतो निकाल लागायचा होता. सर्व नोकरवर्गाचें लक्ष या महत्वाच्या घडामोडीवर खिळून राहिलें होते. आणि दुनीचंद व प्रेमचंद यांच्या एका महिन्याच्या पगाराचा प्रश्न असल्यानें तर त्यांच्या दृष्टीनें या घडामोडीला विलक्षण महत्व आलें होतें.

पण त्यांना पांच वाजेपर्यंत वाट पाहण्याची जरूरच लागली नाहीं. साडेतीनच्या सुमारासच त्यांच्या ऑफिसांत बातमी आली कीं, त्या तरूण गृहस्थाचीच निवड सरकारांतून कायम झाली.

दुनीचंदांचा आनंद गगनांत मावेना. प्रेमचंदांच्या तोंडचें पाणी पळालें. कांहीं वेळानें सिगारेट ओढण्याच्या निमित्तानें दुनीचंदांनीं प्रेमचंदांना बोलावून एका कोपऱ्यांत नेलं. "प्रेमचंद, असें हिरमुसल्यासारखे का झाला? तुम्ही पैजेंत हरलांत म्हणून मी तुमचा महिन्याचा पगार घेईन अशी तुम्हाला भिती वाटली वाटतं? पण मी तुमचा पगार नाहीं घेणार बरं. तुमच्या तोंडचा घास कशाला काढून घेऊं? पण मी तुम्हाला प्रथमपासून सांगत होतों कीं बाबारे, हें स्त्री—राज्य आहे. इथें अनुभवाला किंमत नाहीं. देखणेपणाला—तारुण्याला किंमत आहे. माझा तर्क कधींहि खोटा ठरायचा नाहीं."

दुनीचंदाच्याच नव्हे तर राजधानींतल्या दहा हजार जिभांवर हेंच वाक्य नाचत होतें. आणि कुणी सांगावें त्या वाक्याचे पडसाद राजवाड्यांतल्या गाभाऱ्यांतही उठले नसतील म्हणून?—

थोड्या वेळानें दुनीचंद आणि प्रेमचंद परत आले आणि आपल्या ठराविक कामांना सुरवात करणार तोंच बातमी आली कीं सरकारनें त्या तरुण गृहस्थाला करभारी नेमण्याचा विचार रहित केला असून त्या अनुभवी गृहस्थालाच

कारभारी म्हणून नेमून घेण्यांत आलें आहे.

बातमी कांहीं खोटी नव्हती.

प्रेमचंदांचा आनंद गगनांत मावेना. दुनीचंदांच्या तोंडचें पाणी पळालें. प्रेमचंदानीं दुनीचंदांना बाजूला बोलावून नेलें. "दुनीचंद, तुम्ही माझ्याकडून माझा पगार न घेण्याचा उदारपणा दाखविलात तसाच मीहि उदारपणा तुम्हांला दाखवित आहे. पण लक्षांत ठेवा, कीं तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें हें स्त्रिराज्य आहे, पण तुमच्या अर्थानें नव्हे. थोड्या निराळ्या अर्थानें. म्हणजे स्त्री--बुद्धि अस्थिर असते या अर्थानें."

यावर दुनीचंद कांहीं बोलले नाहींत. मग त्यांचें मत काय होतें हें कसें समजणार ?



## हवेतील मनोरे : :— ९

ऑफिसांतील टाइपरायटरवरून माझी बोटें फिरत होतीं खरीं, पण माझें लक्ष मात्र कामाकडे मुळींच नव्हतें. पुढें ठेवलेल्या कागदावरील अक्षरें डोळ्यांनीं पहायचीं आणि टाइप-रायटरच्या सहाय्यानें दुसऱ्या कागदावर उतरायचीं एवढेंच. पण त्यावेळीं मला जर कुणी विचारलें असतें कीं, 'कोणता मजकूर तुम्हीं टाइप केलात ?' तर मात्र मला नीट उत्तर मुळींच देता आलें नसतें.

कारण माझें सारें लक्ष त्या दिवशीं लागणाऱ्या बी. ए. च्या निकालाकडे लागलेलें होतें. ऑफिसांतील काम संभाळून टर्म भरण्यांकरितां केलेली आटापीट, रात्रीं जाग्रणें करून उरकलेला अभ्यास, उसनवार पैसे आणून भरलेली परीक्षेची फी, इत्यादि गोष्टी आठवल्या कीं, अंगावर झर्दिशी शहारे उभे राहात. पण सुदैवानें पास झालोंच तर.... तेच शहारे आनंदाचे रोमांच ठरत.

मी अशा मनःस्थितींत असतांना ऑफिसच्या शिपा-यानें बाहेर माझ्या नांवाची 'तार आली आहे' अशी वर्दी

जेव्हां दिली तेव्हां मला कसें झालें असेल याचें वर्णन न केलेलेंच बरें.

मी पास झाल्याची बातमी साऱ्या ऑफिसांत हां हां म्हणता पसरली आणि पट्टेवाल्यापासून तों थेट वरिष्ठापर्यंत सर्वांनीं पेढे मागण्यास सुरवात केली. माझ्या खिशांतील पांच रुपयांची एकुलती एक नोट मीं शिपायाच्या स्वाधीन केली व त्यास पेढे आणण्यास सांगितलें.

ऑफिसांतून माझ्या खोलीकडे येतों न येतों तोंच ऑफिसाबाहेरील माझ्या स्नेह्यानीं मला गाठलें आणि माझ्या–कडून पेढे वसूल केले. पेढे वाटण्याचा माझा कार्यक्रम रात्रीं नऊ–साडेनवापर्यंत चाललाच होता.

त्यानंतर मात्र मला एकान्त मिळाला. मीं माझ्या खोलीचें दार पुढें केलें आणि आरामखुर्चीवर पडून विचार करूं लागलों

पास झाल्याचा किंवा मुलगा झाल्याचा आनंद कुणाला होत नाहीं? पण अत्यंत जिकिरीनें अभ्यास करून पास झाल्याच्या आणि नवासांसायासांनीं प्राप्त झालेल्या पुत्रजन्माच्या आनंदाची तऱ्हा कांहीं निराळीच असते. ह्या आनंदाची तऱ्हा निराळी असते ती या अर्थानें कीं, त्या आनंदाला गत दुःखाचा उग्रट वास येत असतो; पण उग्रट वासाची ही बाह्य कवची टाकून देऊन आंतील निर्भेळ आनंदाचा रस चाखतांना पराकाष्ठेचा आनंद होत असतो.

आणि तो रस केवळ मधुर असतो एवढेंच नव्हे, तर त्या रसांत मादकपणा असतो. त्या रसाच्या सेवनानें तो मादकपणा माझ्या अंगांत संचारला होता. माझी दृष्टि धुंद झाली होती. आजूबाजूच्या खडतर परिस्थितीचा मला क्षणमात्र विसर पडला होता. माझ्या धुंद मनोरथांचा एक फांटा उंचावतां उंचावता थेट आमच्या ऑफिसांतील मुख्य व्यवस्थापकाच्या खुर्चीवर स्थिर झालेला होता आणि दुसरा फांटा वळणांवळणांनीं कुमारी उषा हिच्यापर्यंत पोंचून तिला व मला लग्नाच्या बंधनांनीं एकत्र आणूं पहात होता.

तोंच दारावर कुणीसें टिकूटिकू केलें आणि माझ्या अनुज्ञेची वाटहि न पहातां दार उघडून एक व्यक्ति आंत आली. त्या व्यक्तीस पाहिल्यावर मात्र माझ्या अनुज्ञेची वाट न पहातां आंत येण्याचा अधिकार त्या व्यक्तीस आहे हें मला पटलें. तळमजल्यावर राहणारे भागवत मास्तर होते ते.

' कॉंग्रॅच्युलेशन्स हो दिवाकरपंत ! ' मास्तर पुढें येतां येतां म्हणाले.

' थॅंक यू ! ' मी म्हणालों.

' ऑफिसांतलं काम संभाळून तुम्ही परीक्षा दिलीत याबद्दल तुमचं खरोखरीच अभिनंदन केलं पाहिजे. '

' मग पहिल्यांदा अभिनंदन केलंत तें खोटंच कीं काय ? '

' छान ! छान ! चांगलं पकडलंत ! बाकी किती

जपलं तरी व्यवहारांत बोलतांना अशा चुका होतात खऱ्या.'

'चूक झाली तरी ती कबूल करणं कांहीं व्यवहारी माणसाला शोभत नाहीं'

'वा! दिवाकरपंत, आज तुमचा वाग्विहार यथेच्छ चाललाय बुवा! कांहीं हरकत नाहीं. असंच असलं पाहिजे. निदान तुमच्यासारख्या तरुण आणि होतकरू मंडळींनीं तरी असंच असलं पाहिजे. बरं, परीक्षेचे पेढे काढा ना आता!'

उरलेसुरले पेढे मीं त्यांच्या हातीं ठेवले.

'तोंड गोड झालं बरं! पण दिवाकरपंत, तुम्हाला एक विचारूं का? वास्तविक आतांच विचारणं थोडं अप्रयोजकपणाचं आहे; पण व्यवहार म्हणजे असा खडतर आहे म्हणतां, कीं प्रयोजक आणि अप्रयोजक असल्या क्षुल्लक बाबी व्यवहाराच्या सौकर्याकरितां थोडा वेळ बाजूस ठेवाव्या लागतात.'

'तुमच्या व्यवहारी बाण्यास अनुसरून प्रस्तावना तर ठीक वठली. आतां मुख्य विषय काढा पाहूं.' मी हंसत म्हणालों.

'छान टोमणा मारलांत! याला म्हणावं नव्या मेंदूची तरतरी!....आतां मुख्य विषय म्हणजे असा कीं, तुम्ही बी. ए. झालात. पुढं काय?'

'माझ्या बाततींत तरी हा प्रश्न महत्वाचा नाहीं. बी. ए. झाल्याबद्दल मला ऑफिकडून योग्य ती बढती मिळेलच.'

‘ थोडीबहुत बढती मिळाली असं समजा; तरी जन्म-भर टाइपरायटरचे खिळे आपटण्यांतच का तुम्ही आयुष्य घालवणार आहांत ?’

मास्तरांचा प्रश्न मला चांगलाच बोंचला. प्रसंगावधान न राहून मी बोलून गेलों,

‘ खुद्द व्यवस्थापकाची जागा मिळविण्याची हिंमत आहे माझी; काय समजलांत ?’

‘ अरे ! अरे ! अरे ! फार मोठी झेंप घेतलीत तुम्ही दिवाकरपंत ! टाइपरायटरच्या खुर्चीवरून जी उडी मारलीत ती एकदम व्यवस्थापकाच्या खुर्चीवर ! पण एवढी मोठी झेंप तुम्हाला नाहीं निभावयाची. तुम्हां तरुण मंडळींचं चुकतं तें हेंच. उगीचच हवेंत मनोरे उठवून द्यायचे ! अशानं होतं काय, कीं माणसाला हीच संवय लागून राहाते आणि दुसरं असं, कीं हे मनोरे कधीं प्रत्यक्ष व्यवहारांत दिसायचे नसल्या-मुळं दुःख मात्र होतं तेव्हां, दिवाकरपंत, तुमच्या हिताची गोष्ट सांगतों. असले हवेंतील मनोरे उठविण्याच्या नादीं नका लागूं बुवा ! बाकी आम्ही तरी असं कशाला सांगायला हवं म्हणा. व्यवहारांत वाहात चाललांत कीं आपोआप अनुभव येईलच.... ’

अशाच तऱ्हेचें त्या ‘व्यवहार’दक्ष सद्गृहस्थाचें बोलणें कितीतरी वेळ चाललें होतें; पण पुढें पुढें माझें लक्षच त्याच्या बोलण्याकडे लागेना. त्यानेंहि तें ताडलें आणि मला

परत माझ्या एकान्तवासांत सोडून तो निघून गेला.

भागवत मास्तर गेल्यावर एका तिऱ्हाइताच्या नजरेनें मी माझ्या स्थितीकडे पाहूं लागलों. भागवतांचें आगमन माझ्या खोलीमध्यें होण्याच्या पूर्वी मी सुखाच्या सागरांत पोहत होतों. भागवतांनीं मला तिथून बाहेर ओढून काढलें आणि व्यवहाराच्या जाणिवेचे चटके देऊन मला फिरून दुःखाच्या प्रवाहांत लोटून दिलें. माझ्या खडतर परिस्थितीची मला एकदम जाणीव झाली. टाइपरायटरच्या यंत्रावर दिवसभर खट्‌खट् करीत बसणाऱ्या माझ्यासारख्या क्षुल्लक माणसानें व्यवस्थापक होण्याची मनीषा धरावी याचें मला हंसू आलें आणि वाईटहि वाटलें. हवेंत मनोरे कां उभारूं नयेत, यासंबंधीं आपल्या धंद्यास अनुसरून त्यांनीं जे दोन मुद्दे माझ्यासमोर मांडले ते फिरून फिरून माझ्या नजरेसमोर येऊं लागले. मी अस्वस्थ झालों आणि चटकन् उठून खोलींत येरझारा घालूं लागलों.

कांहीं वेळानें विचारांची दिशा बदलूं लागली. भागवत मास्तरांच्या बोलण्यांतील फोलपणा माझ्या लक्षांत येऊं लागला भागवत मास्तर म्हणाले कीं, चारदोन वेळां हवेंत मनोरे रचल्यानें मनास तीच संवय जडून राहते. पण मनास तीच संवय जडून राहिल्यानें माणसाचा काय तोटा होणार आहे? मास्तरांचा दुसरा मुद्दा असा कीं, हवेंतील मनोरे उद्यां सत्यसृष्टींत उतरले नाहींत तर त्यायोगें मनास दुःख होतें. पण उद्यां मनास त्रास होईल म्हणून आज

मनोरे उठवावयाचे नाहींत, यांत एक प्रकारचा भित्रेपणाच नाहीं का दिसून येत ?

लग्न केल्यावर उद्यां पोरबाळांचा वाढता आणि त्रासदायक संसार मागें लागेल म्हणून आज लग्नच करून घेऊं नये, असें म्हणणारास आपण काय 'शूर' म्हणूं ? मुळींच नाहीं. उलट त्रास दायक जीवनांतच धक्केचपेटे खात खात ज्यानें पैलतीर गांठला त्यालाच आपण शूर म्हणतों. जगांतील हरएक महत्वाची गोष्ट, संकटास भिऊन हातपाय गाळणाऱ्या नादानांनीं नव्हे तर संकटांस पहातांच दुप्पट अवसानानें पुढें घुसणाऱ्या जवानमर्दांनींच घडवून आणलेली आहे. भागवत मास्तरांनीं हवेंतल्या मनोऱ्यापासून तोटे म्हणून जे दाखविले ते तोटे नव्हतेच मुळीं.

उलट, 'हवेंतील मनोऱ्यां' पासून एक मोठा फायदा मात्र आहे. माझेंच उदाहरण पहा ना. भागवत—मास्तरांच्या मताप्रमाणें मीं हवेंत मनोरे उभारले. कबूल आहे. पण अंतरिक्षांतील या मनोऱ्यांमधून माझ्या प्रिय उषेसह हिंडतांना मला माझ्या खडतर परिस्थितीची कांहीं वेळ थोडी-तरी आठवण झाली होती का ? आणि पुढें जरी ती आठवण झाली तरी त्या उंच मनोऱ्यांवरून मला माझीं संकटें इवलाली दिसूं लागलीं. लांबून एखाद्या डोंगराकडे पाहिल्यास त्याचा मूळचा भेसूरपणा अजिबात दृष्टीस पडत नाहीं, उलट तो डोंगर नयनमनोहरच दिसतो. त्याप्रमाणें त्या उंच मनोऱ्यां-

वरून माझी खडतर परिस्थिति पुष्कळच कमी खडतर दिसूं लागली. एवढेंच नव्हे तर, कंटकांच्या मागें दडून राहिलेल्या गुलाबाप्रमाणें माझा उज्वल भविष्यकाळ माझ्या सध्यांच्या कंटकमय परिस्थितीच्या पलीकडे आहे आणि तो साध्य करून घेण्यास सध्यां मला कांटे तुडवीत गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें वाटून, माझ्या रम्य भविष्यकालाकडे नेणाऱ्या त्या खडतर परिस्थितीकडे एक प्रकारच्या चमत्कारिक सहानुभूतीनेंच मी पाहूं लागलो. **जीवनांतील खडतरपणाचा अजिबात विसर पाडण्याचें किंवा जीवनांतील संकटांचा भेसूरपणा काढून टाकून त्यांना नरम करण्याचें केवढें दिव्य सामर्थ्य आहे या हवेंतील मनोऱ्यांत.**

या दिव्य सामर्थ्यानें भारावलेला मानवी जीव, विजयानें धुंद होऊन हाणमार करीत पुढें जाणाऱ्या आणि बालेकिल्ल्यावर आपलें निशाण रोंवणाऱ्या आघाडीच्या रणमर्दा-प्रमाणें, अंतरिक्षांतील एका उंच मनोऱ्यावर सरसर चढून जातो आणि त्याच्या शिखरावर उभा राहून अलम दुनियेला गर्जून सांगतों —

' परिस्थितीहुन मी माझ्या ।
मोठा, मजपुढती गमजा— ।
काय चालतिल काळाच्या ।
दैवाच्या ! दुःस्वप्नाच्या ।

# गरिबांची दौलत :-- १०

( १ )

रात्रीची वेळ होती. समुद्रकिनाऱ्यावर राहणाऱ्या एका कोळ्याचें खोपट होतें तें. तिथें बिनकाचेची एक चिमणी मिणमिण जळत होती. त्या चिमणीचा मंद प्रकाश खोपटांतील जिनसावर व तिथल्या जमिनीवर पडलेला होता. एका कोपऱ्यात एक घोंगडी आथरलेली होती. तीवर पाच लहान मुलें झोंपलेली दिसत होतीं. त्या पांची मुलांवर एका वाकळेचें पांघरूण घातलें होतें. त्या मुलांशेजारीं त्यांची आई बसलेली दिसत होती. कसल्यातरी काळजींत ती मग्न झालेली होती. ती कशाची बरें काळजी करीत असावी ?

दुसऱ्या कशाची काळजी करणार ती ? आपल्या नवऱ्यासंबंधीं काळजी करीत होती. तिचा नवरा मासे धरण्यासाठीं दर्यावर गेला होता. आणि तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं परत यावयाचा होता. मासे धरणे हा त्याचा धंदा होता आणि या धंद्यावर तो आपल्या बाल–बच्चांचें पोट भरीत असे. एकादा दिवस त्यानें कामांत चुकवाचुकव केली कीं दुसऱ्या

दिवशीं पोरांचा एक एक घास तोडावा लागत असे, अशी त्याची एकंदर स्थिती असल्यामुळें पाऊस, वारे, वादळ, थंडी, कशाचाही विचार न करतां त्याला आपल्या कामावर जाणें भाग पडत असें.

आपल्या धंद्यांत त्यानें अनेक वर्षें घालविलीं असल्यामुळें तो चांगला वाकबगार झाला होता. पण हा धंदाच असा होता कीं, बरकत येण्यासाठीं हरघडी जीव धोक्यांत टाकल्यावाचून गत्यंतर नव्हतें. ज्या ठिकाणीं मासे पुष्कळ मिळण्याचा संभव असे अशी जागा समुद्राच्या चंचल पाणभुईवर एकसारखी बदलत राही आणि अशा जागेचा व्यापहि फार लहान असे. त्या जागेच्या चहूबाजूंनीं डोंगरलाटा उठत असत. धुकें असो, वादळ असो, अगर काळोख असो, तो कुशल दर्यावर्दी अशी जागा आपल्या अनुभवाच्या आणि धाडसाच्या जोरावर हेरून काढीत असे व तिथें आपली होडी नेत असे. तिथें लाटांच्या नागिणी त्याच्या अंगाला चाटून जात असत, तणावलेल्या शिडांचें कण्हणें सुरू असे, काळोखाचा सागर वरखालीं होत असें आणि जाळें टाकतांना अगर तें वर खेंचून घेत असतांना प्रत्येक क्षणीं होडी उलटण्याची भीती असे. प्रत्यक्ष काळाच्या दाढेंत उभें राहून काम करीत असतां देवाला नमस्कार करण्याकरतां मधून मधून त्याचे हात वर होत असत आणि त्याच्या मनांत आपल्या आवडत्या बायको–मुलांबद्दल विचार चालत असत.

त्या वेळीं त्याची घरधणीण घरीं खुशाल झोंपलेली असेल अशी जर तुमची समजूत झालेली असेल तर ती निखा-लस चुकीची होय. नवरा दर्यावर गेल्यावर त्याच्यासंबंधीच्या काळजीमुळें तिला झोंप येणेंच शक्य नव्हतें. जागेपणीं विरंगुळा म्हणून नादुरुस्त झालेलीं जाळीं दुरुस्त करण्यांत, फाटलेलीं शिडें शिवून टाकण्यांत किंवा अशाच कसल्या तरी कामांत ती स्वतःला गुंतवून ठेवीत असे. आणि काम करवेनासें झालें कीं बिछान्यावर पडून घरधन्याची काळजी करण्यांत आणि त्याला सुरक्षित ठेवण्याबद्दल देवाचा धावा करण्यांत ती आपली उरली–सुरली रात्र घालवीत असे.

( २ )

एका रात्रीं तिचा नवरा असाच दर्यावर कामास गेला असतां ती विचार करीत बसली होती. मुलें नित्याप्रमाणें जेवून झोंपली होती. त्यावेळीं मुख्यतः आपल्या दारिद्र्याबद्दल उद्वेगजनक विचार तिच्या मनांत चालू होते. तिच्या पांच मुलांपैकीं एकाला अंगांत घालण्यास कुडतें नव्हतें तर दुसऱ्यास पायांत घालण्यास वाहाणाच नव्हत्या ! त्या बिचाऱ्यांना मिष्टान्न तर कधींच खायला मिळालें नव्हतें.

ती आपल्या विचारांत चूर असतां वाऱ्याचा सूं ऽ ऽ ऽ असा आवाज तिच्या कानांवर येऊं लागला. वाऱ्याच्या त्या आवाजांतच रात्रपक्ष्यांच्या कर्कश किलबिलाट मिसळलेला होता. ऐरणीवर घणाचे घाव पाडतांना जसे आवाज होतात

तसे लाटांचे किनाऱ्यावर आवाज होऊं लागले. भयानक वादळाचीं चिन्हें होतीं तीं. तिचें काळीज धडधडूं लागलें. आणि कांहीं वेळानें डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

तशा मनःस्थितींत सारी रात्र तिनें घालविली. पहांटेच्या वेळीं वादळाच्या मदतीला पाऊसहि धावून आला. घराच्या छपरावर कोसळणाऱ्या पावसाच्या सरींचा थडथड आवाज ऐकूं येऊं लागला. त्यामुळें दूर कुठें कोंबडा आरवला तेंहि तिला नीटपणें ऐकूं आलें नाहीं.

उजेडायला आलें तेव्हां तिला राहवेना आणि घरधनी किनाऱ्याकडे येऊं लागले आहेत कीं नाहीं हें पाहण्यासाठीं म्हणून इरलें घेऊन ती बाहेर पडली. पण अद्याप बाहेर काळोख असल्यामुळें तिनें परत येऊन कंदील घेतला व ती फिरून बाहेर पडली.

आसपासच्या झोंपड्यांतून तुरळक जाग दिसत होती. पण माणसांचा वावर अद्याप मुळींच दिसत नव्हता. ती समुद्राकडे चालली असतां वाटेंत तिला एक घर लागलें. तें घर जुनाट झालेलें होतें. त्यामुळें रात्रीच्या वादळानें आणि पावसानें त्याची एक भिंत कोसळली होती आणि उरलेल्या भिंतींत वरचें कलंडलेलें छप्पर तोलून धरण्याची शक्ति क्वचितच राहिली होती. त्या घरांत दिव्याचा अगर विस्तवाचा मागमूसहि दिसत नव्हता. त्या घराकडे नजर जातांच तिच्या लक्षांत आलें कीं, तें एका गरीब विधवेचें घर होतें. आणि

त्या निराश्रित गरीब विधवेला गावांतल्या लोकांनीं अनेक वेळा मदत केली होती आणि तिनेंहि केली होती. एक भिंत कोसळून पडली तरी ती बाई जागी होत नाहीं म्हणजे आश्चर्य नव्हे का ? असा विचार तिच्या मनांत आला आणि जातां जातां तिला जागे करून पुढें जावें म्हणून ती तिच्या दाराशीं थांबली आणि तिनें त्या गरीब विधवेला हांक मारली.

तिनें हांका मारल्या, दारावर ठोठावलें, आणि कानोसा घेतला. आंत अगदीं सामसूम होतें.

" गरीब बिचारी आजारी असावीसें दिसतें. त्या बिचाऱ्या मुलांचें आतां काय होईल ? "

तिनें फिरून एकदां हांक मारली, तरीहि आंत सामसूमच.

" कसली गाढ झोंप लागली हिला ! हांक मारूनहि जागी होत नाहीं ! "–

त्याच वेळीं वाऱ्याचा जोराचा झोत दारावर आदळला आणि दार थोडें सरकलें. ती आंत गेली. त्या काळोख्या आणि स्तब्ध अशा झोंपडींत तिच्या कंदिलाचा जो प्रकाश पडला त्यामुळें छपरांतून गळणाऱ्या असंख्य जलधारा तिला दिसल्या. त्या जलधारांच्या पलीकडे एका कोपऱ्यांत एक भयंकर मानवी आकृति अस्ताव्यस्त पडली होती. गरिबीशीं झुंजणाऱ्या आणि झुंझत झुंझत झिजत जाणाऱ्या एका काळच्या धडधाकट मातेचा तो निष्प्राण देह होता.

त्या मृत मातेजवळ असलेल्या पाळण्यांत दोन लहान बाळें-एक मुलगी आणि एक मुलगा झोंपेंत हंसत होतीं. मरतां मरतां त्या प्रेमळ मातेनें आपल्या अंगावरचें पांघरूण त्यांच्यावर घातलें होतें. तें अद्याप तसेंच त्यांच्या अंगावर होतें.

त्या खिळखिळया झालेल्या पाळण्यांत त्या लहानग्यांना किती गाढ झोंप लागली होती ! बाहेर धो धो पाऊस पडत होता. आणि समुद्राच्या लाटांचा प्रचंड आवाज होत होता. त्या गळत्या छपरांतून पाण्याचा एक थेंब नेमका त्या मृत शरिराच्या निस्तेज डोळ्यावर पडला आणि तेथून तो थेंब एकाद्या अश्रुबिंदुप्रमाणें घळकन् खालीं ओघळला.

३

त्या स्त्रीच्या घरांत ती काय करीत होती ? ती आपल्या पदराखालीं काय दडवून ठेवीत होती. तिचें काळीज असें धडधडत कां होतें ? आपल्या घरच्या गरिबीमुळें ती चोरी सारख्या पातकास तर प्रवृत्त झाली नव्हती ना ? मागें पाह-ण्याचा धीर न दाखवितां ती सोसाट आपल्या झोंपडीकडे कां पळत सुटली ?

ती परत आपल्या झोंपडींत येऊन पोंचली तेव्हां दूर असलेल्या डोंगरांच्या माथ्यावर सूर्याचे कोंवळे किरण पडलेले दिसत होते. भोंवतालच्या सृष्टीचा चेहरा तेजानें उजळल्या-सारखा झाला होता. पण तिचा चेहरा मात्र फटफटीत दिसत

होता. कदाचित् केलेल्या कृत्याबद्दल तिला पश्चात्तापहि होत असावा. मधूनमधून उशालगतच्या वळकटीवर ती आपलें डोकें टेकीत असे. तिच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजलें होतें. मध्येंच एकादा तुटक शब्द तिच्या तोंडून बाहेर पडत असे.

" घरधनी घरीं आल्यावर काय म्हणतील? अगोदरच त्यांचा त्रास त्यांना पुरे झालेला आहे.... आतां मी काय करूं?.... पांच कच्चा-बच्चांचीं पोटें भरायचीं, तीं भरायसाठींच त्यांना राब राब राबावं लगतं. अन् हें थोडं झालं म्हणूनच कां ही नवी काळजी मी त्यांच्या शिरावर लादली!.... आलेच कीं काय ते?.... अजून नाहीं.... तेवढंच बरं झालं! ते यायचे म्हणून रोज आनंद वाटायचा अन् आज त्यांच्याबद्दल मला अशी भीती कां वाटायला लागली?"....

एकाएकीं दार उघडलें गेलें. स्वच्छ सूर्यप्रकाशाचा झोत आंत आला आणि त्या झोताबरोबर तिचा नवराहि आपलें ओलेचिंब झालेलें जाळें ओढीत हंसतमुखानें आंत आला.

ती चटकन् आपल्या जागेवरून उठली.

" आज आपलं नशीब कांहीं जोरावर नव्हतं." आंत येत येत तो म्हणाला.

" वादळ फारच जोराचं झालं काय?" तिनें विचारलें.

" फारच जोराचं."

" मच्छेमारी ? "

" अगदींच वाईट. पण कांहीं फिकीर करूं नको. आपली परतभेट झाली यांतच माझें समाधान आहे. तुफानामुळें जाळं मात्र फार नादुरुस्त झालं आहे. किती जोराचं वादळ तें ! एकदां तर नाव अगदीं उपडी होण्याच्याच बेताला........"

" काय ? उपडी होण्याच्या बेताला ? "

" होय....ते जाऊं द्या. या धंद्यांत असं चालायचंच. मुलं कुठें बाहेर गेलीं आहेत वाटतं ? ........"

हुश्शऽहुश्श करीत तो सतरंजीवर बसला.

मोठ्या संकटांतून आपला नवरा सुखरूप परत आला त्याबद्दल आनंद आणि आपण सकाळीं जी गोष्ट केली ती जर आपल्या नवऱ्याला पसंत पडली नाहीं तर त्यास येणारा राग व त्या रागाची तिला वाटणारी भीति या चमत्कारिक भावनांच्या विलक्षण खळबळीमुळें तिच्या शरिरास कंप सुटला. त्या अवस्थेंतच तिनें सांगायला सुरवात केली:—

' आपल्या गांवांतील ती गरीब बाई मेल्याचं कळलं कां तुम्हाला ? काल रात्रीं तुम्ही बाहेर पडल्यावर बहुतेक ती मेली असावी. तिला दोन मुलें आहेत. मुलगा आतां कुठें एखादें पाऊल टाकूं लागला आहे अन् मुलगी आतां कुठें एखादें अक्षर बोलूं लागली आहे. त्या गरीब मुलांचा सांभाळ करणारें दुनियेंत कोणीच नाहीं. त्यांचें आतां पुढें कसें

होईल हें एका भगवंतालाच माहीत !—'

तो मनुष्य हें ऐकतांच गंभीर दिसू लागला. वादळा-मुळें दुमडलेली आपली टोपी त्यानें डोक्यावरून काढली आणि कोपऱ्यांत फेंकून दिली. " काय करावं, अगोदरच आपलीं पांच मुलं तशांत आणि या दोघांची भर पडली म्हणजे तीं सात व्हायचीं. सध्यांच आपण अन्नाला महाग होऊन बसलों आहोंत ....पण....पण या गरिबीला मी कां जबाबदार आहे? ही देवाचीच करणी आहे. आणि देवाची करणी मला कांहीं उमजत नाहीं. देवानं त्या पोरक्या पोरांची आई कां बरं न्यावीं?.... तीं मुलं इतकीं लहान आहेत म्हणतेस ? जा तर मग. अगोदर त्यांना इकडे आण पाहूं. एव्हांना तीं जागीं झाली असतील आणि आपली आई निपचित पडलेली पाहून तीं बिचारीं घाबरून गेलीं असतील. आपण आपल्या मुलां-बरोबर त्यांचाहि सांभाळ करूं. आपल्या अर्ध्या भाकरींतला त्यांनांहि एकेक तुकडा देऊं. या अनाथ मुलांचा सांभाळ करण्याची जबाबदारी आपल्यावर पडली आहे हें भगवानाला दिसल्यावर तो आपल्याला धंद्यांत बरकत दिल्यांवांचून राहणार नाहीं. माझ्याबद्दल म्हणशील तर मी सध्यां राबतों त्याच्या दुपटीनेंहि राबायला तयार आहे ....पण ही बडबड पुरे. अगोदर जाऊन त्यांना घेऊन....हें काय ? काय झालं तुला ? तूं अशी स्तब्ध कां ? तुला कसला त्रास कां होत आहे ?"

अत्यंत प्रसन्न मुद्रेनें तिनें बिछान्यापुढचा पडदा बाजूला

केला. बिछान्यावर दोन गोजिरवाणीं लहान मुलें स्वस्थ झोंप-लेलीं दिसत होती.

"हें पहा, आज सकाळीं मी ही दौलत चोरून पदराखालीं दडवून घरीं आणली."

'व्हिक्टर ह्यूगो'वरून



# आडनांवें : :— ११

त्या वेळीं कांहीं कामानिमित्त मी प्रिन्सिपॉल साहेबां-
कडे गेलों होतों. माझें काम झाल्यावर मी बाहेर पडणार
तोंच दुसरे एक गृहस्थ आंत आले. यानंतर मी तिथें राहणें
शिष्टाचाराला धरून युक्त नव्हतें. पण या गृहस्थाचें प्रिन्सि-
पॉलसाहेबांकडे काय काम आहे हें जाणण्याची उत्सुकता बळा-
वल्यामुळें मी साहजिकच तिथें रेंगाळल्यासारखें केलें.

प्रिन्सिपॉलसाहेबांनीं त्याच्याकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें.
अधिकउणें न बोलतां त्या गृहस्थानें एकदम मुद्यालाच हात
घातला. " साहेब, माझं आडनांव बदलायचं आहे. "

" आडनांव बदलायचं आहे ? आडनांवच कीं सबंध
नांव ? "

" छे ! छे ! नुसतं आडनांव. "

जास्त वेळ रेंगाळणें शक्य नसल्यानें मी काढता पाय
घेतला. पण मनांत विचार हाच. या गृहस्थाला आपलें नांव
कां बदलायचें आहे ? आणि तेंही नुसतें अडनांवच ? दत्तक
गेला आहे म्हणावें तर सबंध नांव बदलायला हवें. तेव्हां

राहतां राहिलें एकच कारण. तें म्हणजे त्या गृहस्थाला आपल्या आडनांवाचा तिरस्कार वाटत असावा. त्याचें आडनांव काय होतें हें ऐकायला मिळालें असतें तर या मुद्यावर छान प्रकाश पडला असता.

तथापि आपल्या आडनांवाचा तिरस्कार करणारी मंडळीं माझ्या पाहण्यांत कांहीं कमी नव्हती. मी प्राथमिक शाळेंत होतों तेव्हां माझ्या बरोबरीची न्हावी, सुतार, महार ह्या आडनांवांची मंडळी पुढें तीन चार वर्षांत अनुक्रमें गायकवाड, भोसले, डोणे अशी झालेली मला माहित होती.

बाकी आडनांवें बदलणाऱ्या मंडळीकडून एक मुद्दा पुढें करण्यांत येईल; आपल्याकडील बरींचशीं आडनांवें जातीवरून किंवा धंद्यावरून पडलेलीं असतात. विलायतेंतसुद्धां गोल्डस्मिथ, कार्पेंटर, इत्यादि धंद्यावरून पडलेलीं आडनांवें दाखवून देतां येतील. पण जातीवरून पडलेलीं आडनांवें मात्र आमच्या देशांतच विशेषतः आढळून येतात. हा कोण ? महार. हा कोण ? मांग. हा कोण ? कोळी. हा कोण ? न्हावी. अलीकडच्या काळांत समतेचें तत्व जारीनें अमलांत येत असल्यानें आडनांवांच्या योगानें प्रगट होणारी ही जातींजातींतील विषमता त्या त्या मंडळींना आवडत नसावी हें उघड आहे.

पण कित्येक वेळां नांवाच्या मोठेपणासाठीं आडनांवांचीं जीं स्थित्यंतरें होतात ती मोठीं हास्यास्पद असतात. एक उदाहरण मला ठाऊक आहे. या गृहस्थाचा वाडवडिलां-

पासून चालत आलेला धंदा तांबटाचा होता आणि प्राथमिक शाळेंत असतांना तो रीतसर तांबट असें आडनांव लावी. पुढें हायस्कुलांत आल्यावर त्यानें आपलें तांबट हें आडनांव बदलून "मोरे" असें नवें नांव धारण केलें. पण मंगळाच्या नवऱ्याच्या बायका लागोपाठ मरतात त्याप्रमाणें या नव्या आडनांवालाही त्याच्या नांवाबरोबर नांदण्याचें सद्भाग्य फार दिवस लाभलें नाहीं. कॉलेजांत येतांच सदरहू 'मोरे' 'भोसले' झाले. जावळीच्या चंद्रराव मोऱ्यांचा शिवाजी भोसल्यांनीं वध केला या ऐतिहासिक गोष्टीचा तर त्यांच्या मनावर परिणाम झाला नसेल ना? प्रस्तुत तांबट 'भोसले' झाले म्हणून कुणीही भोसल्यानें आपली मुलगी त्यांच्या घरीं देऊन सामाजिक सुधारणा घडवून आणण्याचें श्रेय घेतलें नाहीं ही गोष्ट निराळी.

नांव बदलण्याच्या मुळाशीं असलेली मोठेपणाची ही हास्यास्पद कल्पना पाहिली कीं मनाच्या कोतेपणाबद्दल कींव करावीशी वाटूं लागतें. मोठेपणा हा आडनांवावर अवलंबून असतो असें कुणी सांगितलें आहे? उलट आपल्याला असें दिसून येईल कीं, माणसांनींच आडनांवांना मोठेपणा आणिला आहे. दुसऱ्यांनीं श्रम करून पैसा मिळवावा आणि एखाद्यानें तो हळूंच लांबवावा या कृत्याला व्यवहारांत चोरी म्हणतात. आपण स्वत: कर्तबगारी गाजविली नाहीं आणि आपण आपलें मूळचें आडनांव बदलून नवीन आडनांव लावतों भोसल्यांचें!

भोसले या आडनांवांत जी जादू भरली आहे ती जादू शहाजी शिवाजी, संभाजी यांसारख्या पराक्रमी पुरुषांच्या कर्तबगारीची जादू आहे. तें कर्तबगार आडनांव आपण आपल्या नांवांपुढें आणून बसवूं लागलों तर ती एका अर्थी चोरीच नव्हें काय?—

आडनांवाच्या मोठेपणावर विकणाऱ्यांपेक्षां आडनांवाला मोठेपणा आणणाऱ्या पुरुषालाच समाजांत मान्यता मिळत असते. आपण कुत्र्याला दाराच्या आंत येऊं देत नाहीं आणि मांजर मात्र स्वयंपाकघर सोडून हालत नाहीं या विरोधाचें मर्म शोधून काढतांना एका इंग्रज लेखकानें असें म्हटलें आहे कीं मांजराच्या ठिकाणीं जितका स्वाभिमान असतो तितका तो कुत्र्याच्या ठिकाणीं असत नाहीं, म्हणून कुत्रा जरी इतका इमानी आहे तरी त्याला कुणी स्वयंपाकघरांत घेत नाहीं. स्वतांच्या कर्तबगारीच्या जोरावर आडनांवामध्यें जादू निर्माण करणाऱ्या पराक्रमी पुरुषांच्या ठिकाणीं हा स्वाभिमान किंवा स्वतःशीं असलेला सच्चेपणा हमखास दिसून येतो.

मी आतां चोखामेळा, रोहीदास चांभार, गोरा कुंभार इत्यादिकांचीं जुनीपुराणीं उदाहरणें देत बसत नाहीं. अगदीं आपल्या परिचयाचीं उदाहरणें घेणार आहे. ‘ आगरकर ’ हें आडनांव उच्चारतांच आपल्या नजरेसमोर “ होतां होईल तों तुमच्या शिव्याशाप व जुलूम यांस न भितां तुमच्या डोक्यांत प्रकाश पाडण्याचा ते प्रयत्न करतील ” या सुधारकांच्या ब्रीदवाक्याची घोषणा करणारे कैलासवासी

गोपाळराव आगरकर हे उभे राहतात. गोपाळरावांच्या पूर्वी आगरकर या आडनांवाला महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासांत कितीसें महत्व होतें ? गोपाळरावांचे पणजे बच्चाजीपंत, आजोबा विष्णुपंत, आणि वडील गणेशपंत हे सर्वजण अगदीं सामान्य गृहस्थ होते. आज 'आगरकर' या आडनांवाला जें महत्व आहे तें गोपाळरावांनींच आणिलें आहे. संपत्ति आपल्या पायांनीं त्यांच्या घरीं चालून आली असतां तिला लाथेनें झुगारून देणाऱ्या गोपाळरावांच्या स्वाभिमानाच्या कितीतरी गोष्टीं सांगतां येण्यासारख्या आहेत !....

जी गोष्ट 'आगरकर' या आडनांवाची तीच गोष्ट 'टिळक' या आडनांवाची. गोपाळराव आगरकरांच्या पूर्वी जसे 'आगरकर' या आडनांवाला महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासांत महत्व नव्हतें तसेंच लोकमान्य टिळकांच्यापूर्वी 'टिळक' या आडनावाला महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासांत कांहीं महत्व नव्हतें. तें महत्व लोकमान्य टिळकांनींच आणून दिलें. "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" या राष्ट्रीय महामंत्राची टिळकांनीं जी गर्जना केली तींतच त्यांचा स्वाभिमान ओतप्रोत भरला आहे असें मला वाटतें.

उदाहरणें देत बसलों तर निबंध निष्कारण फुगत जाईल. ज्या मुद्याचें मला स्पष्टीकरण करावयाचें होतें त्याचें स्पष्टीकरण या दोन उदाहरणांनीं झालेंच आहे. तेव्हां अधिक उदाहरणें देत बसण्याची जरुरी नाहीं. तथापि माझ्या वाचनांत

आलेलें एक उदाहरण मात्र मला अवश्य द्यावेसें वाटतें. कर्तबगार आणि स्वाभिमानी मनुष्य आपल्या करामतीच्या जोरावर आडनांवांत जादू कशी ओतूं शकतो याचें इतकें तंतोतंत उदाहरण क्वचितच पहावयास मिळेल.

वक्तृत्वकलेंत ज्याचें नांव अग्रभागीं असतें अशा सुप्रसिद्ध सिसरोचें 'सिसरो' हें आडनांव त्याच्या एका पूर्वजाच्या नाकावर खाच होती म्हणून प्रचारांत आलें होतें. त्याच्या पूर्वजाच्या नाकावरील ही खाच घेवड्याच्या बियावरील खाचेसारखी दिसत असे. घेवड्याच्या बियाला रोमन भाषेंत 'सिसर' म्हणतात. तेव्हां ही 'सिसर' ज्याच्या नाकावर आहे तो सिसरो असें नांव प्रचारांत आलें. या मूळ पुरुषाचा वंशज जो इतिहासप्रसिद्ध सिसरो तो पुढें आपल्या तरुणपणीं जेव्हां रोमन राजकारणांत आणि थोरामोठ्यात चमकूं लागला तेव्हां त्याच्या एका आस्थेवाईक स्नेह्यानें त्याला हें अभद्र आडनांव टाकून देऊन एकादें चांगलें आडनांव घेण्याला सुचविलें तेव्हां सिसरोनें उत्तर दिलें तें अवश्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. सिसरो म्हणाला; "छत्! कांहीं तरीच! माझें आडनांव मी इतकें उज्वल करीन कीं रोमन इतिहासांतली स्कौरी किंवा क्याटुली हीं प्रसिद्ध आडनावेंही त्यापुढें फिकीं पडावींत." आणि खरोखरीच सिसरोनें आपलें आडनांव इतकें उज्वल केलें कीं, स्कौरी किंवा क्याटुली हीं आडनांवें त्यापुढें फिकीं पडलीं. एका इंग्रज लेखकानें म्हटल्याप्रमाणें "स्कौरी किंवा क्याटुली या

आडनांवांचा सिसरोनें एकदां उच्चार केला म्हणून आपल्यास त्यांचा परिचय तरी आहे. पण खुद्द सिसरोचें नांव आपल्या इतक्या परिचयाचें आहे. कीं आपल्या शेजारी राहणाऱ्या गृहस्थाचें नांव देखील आपल्यास तितक्या परिचयाचें नसेल!" हे उद्गार अक्षरशः खरें नाहींत काय ?



## लोकांकरितां : :- १२

गेले चार दिवस पावसाची सारखी झिमझिम सुरू होती. नागपंचमीला नदीला पूर यायचा हें नदीकांठच्या लोकांना ठाऊकच असतें आणि गेल्या चार दिवसांत नदीला सारखें पाणी चढूं लागलें तेव्हां लोकांना त्यांत फारसें आश्चर्यही वाटलें नाहीं.

पण पांचव्या दिवशीं मात्र ही स्थिति राहिली नाहीं. त्या दिवशीं सकाळपासून पाणी भराभर चढूं लागलें आणि पाणी चढण्याचें हें प्रमाण असेंच कायम राहील तर आणखी सात आठ तासांत नदीकांठची, समोरासमोरचीं सर्जेराव इनामदारांची मांजरी आणि काळी ही दोन गांवें जलमय होऊन जाणार याबद्दलही कुणालाच शंका राहिली नाहीं.

पंधरा वर्षांपूर्वीं हा प्रसंग आला असतां तर सर्जेरावांनीं त्याची बिलकूल खातर बाळगली नसती. पण अलीकडे वार्धक्याची झुळूक त्यांच्या अंगावर येऊं लागली तेव्हां व विशेषत: गेल्या वर्षीं हातातोंडाला आलेला त्यांचा वडील मुलगा मरून गेला त्यावेळेपासून सर्जेरावांचें मन लोण्यासारखें मऊ झालें

होतें आणि नदीला पाणी चढूं लागून आपल्या रयतेची मालमत्ता आणि जीवित धोक्यांत येऊं लागलीं हें पहातांच ते अधीर मनानें मांजरी गांवाच्या नदीच्या रोखानें चालले. ते नदीकाठीं येऊन पोंचले तेव्हां चाळीस पन्नास गांवकऱ्यांची त्यांच्याभोंवतीं गर्दी जमली होती.

नजरेसमोर बेफाटपणें खळखळत जाणारा पाण्याचा प्रचंड प्रवाह आणि पलीकडे—अगदीं दूर काळी गांवांतलीं दिसणारीं पांचसात घरें !—

दोन्हीं गांवच्या गांवकऱ्यांवर बिकट प्रसंग आले होते. पण एखाद्या वेळेस उडदांतही काळेगोरे निवडणें शक्य असतें त्याप्रमाणें मांजरी गांवापेक्षां काळी गांवच जास्त संकटांत होता. त्या गांवास तीन्ही बाजूंनीं नदीनें वेढिलें होतें. आणि नदीला पाणी आलें म्हणजे तें नदीला मिळणाऱ्या सरळ्यांतून आणि ओतांतून पसरे व त्यायोगें काळी गांवास एखाद्या चिमुकल्या बेटाचें स्वरूप येई.

चार दिवसांखालींच त्या गांवाला बेटाचें स्वरूप आलें होतें पण आज मात्र—

सर्जेरावांना त्या परिस्थितीच्या भयंकर स्वरूपाकडे पाहण्याचा धीरच होईना.

काळी गांवांतल्या लोकांचीं बरीचशीं घरें पुरांत बुडालीं असतील........

तसें झालें असेल तर गांवकऱ्यांना अन्नपाणी, कपडे,

आसरा........?

संगमनाथाच्या देवळांत आणि चावडींत त्यांना कसा-बसा आसरा मिळेल पण त्यांना कपडे अन्नपाणी—

सर्जेरावांची नजर प्रवाहांत अर्धवट बुडालेल्या एका बाभळीच्या झाडाकडे सहज गेली. त्या झाडाचा बहुतेक भाग पाण्यांत बुडालेला होता व ज्या दोन फांद्या अवशेष होत्या त्यांना वेटाळून बसलेले दोन साप....

क्षणभर सर्जेरावांची विचारशक्ति आणि कल्पनाशक्ति सुन्न झाल्यासारखी झाली. पण प्रसंगच इतका चमत्कारिक होता कीं, त्यांच्या कल्पनाशक्तीला सुन्न बसण्याचासुद्धां विलास उपभोगतां येण्यासारखा नव्हता.

" म्हादबा, " सर्जेरावांनीं आपल्याभोंवतीं जमलेल्या गांवकऱ्यांपैकीं एकाला हटकलें. " म्हादबा, वाड्यांत जा आणि चार मण हरभरे भाजून तयार ठेवायला सांग. चावडी-कडे जाऊन गांवांत असेल नसेल तें पीठ गोळा करून भाकरी करवून घ्यायला पाटलाला सांग. "

सर्जेरावांच्या हुकुमाप्रमाणें गोष्टीं होतील. पण हरभरे आणि भाकरी पलीकडे कोण नेऊन पोंचविणार ?—

माणसें धाडून त्यांनीं गांवांतले कसलेले नामांकित कोळी लोक बोलावून आणले पण अशा तुफान प्रवाहांत होडी घालण्याची एकाहि कोळ्याची छाती झाली नाहीं.

शिवबा झुंजार नांवाच्या एका बहाद्दराने पंधरावर्षां—

खालीं असल्या प्रचंड प्रवाहांत होडी घातली होती. त्या प्रसं-गाची सर्जेरावांना आठवण झाली.

माणूस धाडून त्यांनीं शिवबांना बोलावून आणलें.

" झुंझार, " —

" जी, सरकार ! "

" समोर काळी गांव पाण्यांत बुडून चाललेला दिसतो आहेना तुम्हांला ? "

" ' दिसतो आहे ! ! '— माजा जावाईच ततं—ऱ्हात असतो सरकार. पंचमीच्या सनाला लेकीला माहेरपनाला आणली पन् सन ऱ्हायला बाजूला आन् सकाळ धरून घरांत रडारडमतर सुरूं झालीया. "

" मग एवढं धाडस कराल का ? निदान मण दोन मण हरभरे आणि आम्ही देऊं त्या भाकरी होडींतून तुम्हीं गांवकऱ्यांना पोंचवाल का ?— नाहीं म्हणूं नका. असल्या पुरांत तुम्हीं होडी घालीत असतां याची आम्हांला दखल आहे. '

" पण सरकार, जवानींतल्या गोष्टी आज म्हातारपनांत कशा चालतील ? "

तुम्हीं धाडस करणार नाहीं तर त्या गावकऱ्यांना घासभरसुद्धां अन्नाला पारखे होऊन थंडीवाऱ्यांत तडफडत पडावें लागेल. तुम्हीं मनांत आणाल तर परमेश्वर तुम्हांला हवें तें बळ दिल्याखेरीज रहायचा नाहीं. "

" जशी आपली मर्जी. "

२

आपल्याला हवें तें होडगें तयार ठेवायला सांगून इनामदारांचा निरोप घेऊन झुंझार घरीं येण्याच्या पूर्वीच त्यांच्या नव्या निश्चयाची वर्दी कुटुंबांत कळली असावी; एरवीं झुंझार घरीं येत आहेत तें दिसतांच त्यांची मुलगी आवडी त्यांच्याकडे धांवत गेली नसती आणि तिनें त्यांच्याबरोबर होडींतून पलीकडे येण्याचा हट्टही धरला नसता.

—आणि झुंजारांना जबरदस्त पेंच पडला तो या गोष्टीचाच. स्वतःच्या जिवाची धडगत दिसत नव्हती तिथें ते आपल्या लेकीला आपल्या बरोबर यायला कसें सांगणार? बरें, तिचा नवरा पलीकडे संकटांत सांपडला असतां इथें घरीं तिला खुशाल बसून रहायला तरी ते कसें सांगणार? आणि त्यांनीं सांगितलें तरी त्यांचे कोण ऐकणार?—

पण त्या पेंचप्रसंगाला तोंड देण्याखेरीज गत्यंतरच नव्हतें. एकवेळ स्वतःचा प्राण खर्ची घालण्याचा प्रसंग आला तरी हरकत नाहीं पण आपण आपल्या लेकीला तिच्या नवऱ्याच्या स्वाधीन केल्याशिवाय राहणार नाहीं, असा मनाशीं निश्चय करीत असतांच बाह्यात्कारीं त्यांनीं मोठ्या नाखुषीनें आवडीला आपल्याबरोबर येण्याची परवानगी दिली.

३

झुंझार तयार झाले तेव्हां कोळी मंडळींनाहि धीर

पोंचला आणि त्यांच्यापैकीं दोघेजण झुंझारांना मदत करायला तयार झाले.

होडींत चढण्यापूर्वी त्या चौघांना निरोप देण्याकरितां सबंध गांव नदीकिनाऱ्यावर लोटला.

आकाश अभ्रांनीं भरून गेलेलें असल्यामुळें सूर्याचें स्थान नक्की सांगतां येत नव्हतें; तरी सूर्य डोक्यावर आला असल्याचें दिसत होतें.

झुंझारांनीं होडींत पाय ठेवला त्याच वेळीं त्यांना शंका आली कीं होडींत बाजवीपेक्षां जास्त ओझें लादलेलें आहे—

पण तींतलें कुठलें सामान कमी करतां येण्यासारखें होतें ? हरभऱ्याची दोन पोती आणि भाकरीची एक चवढ—

त्यांनीं होडी ढकलली व थोड्याच वेळांत ते धारेला लागले त्यावेळीं झुंझारांना समजून चुकलें कीं आहे तें ओझें कायम ठेवण्यांत धोका आहे.

त्यांनीं फिरून एकदां साऱ्या गोष्टींचा नीट विचार केला व आपल्या मदतनीसांच्या सहाय्यानें त्यांनीं त्या दोन पोत्यांपैकीं एक प्रवाहांत ढकलून दिलें.

त्यांची होडी बरीच हलकी झाल्यासारखी वाटली.

पण झुंझारांना प्रवाहाशीं झुंझ करावयाची होती ती या पुढेंच.

होडीचें सुकाणूं झुंझारांनीं धरलें होतें. त्यांचे मदतनीस वल्हीं मारीत होते. होडी घोळांत सांपडली कीं कांहीं वेळ

तिची गति कुंठित होई. अशावेळीं जिवापाड श्रम करून त्या तिघांना ती पुढें काढावी लागे पण दुसऱ्याच क्षणीं ती एखाद्या प्रचंड लाटेवर चढे आणि इतक्या वेगानें खालीं येई कीं लाटांच्या चार भिंतींत कोंडून टाकल्यासारखी तिची अवस्था होई. बिचारी आवडी क्षुधित लांडग्यांच्या कळपाच्या भीतीनें पळून पळून दमून जाऊन धरणीवर अंग टाकणाऱ्या भीतिग्रस्त हरिणीप्रमाणें असहाय होऊन बसली होती.

—आणि आतां कुठे ते निम्मे अंतर तोडून आले होते !

झुंझारांना स्पष्ट समजून आलें कीं आहे त्यापेक्षांहि होडी हलकी झाल्याशिवाय उरलेलें अंतर तोडून जाणें शक्य नाहीं—

पण आतां होडींतलें काय कमी करण्यासारखें होतें ? उरलेलें हरभऱ्याचें पोतें ? भाकरीचीं चवढ ? या गोष्टी कमी करायच्या तर पलीकडे जायचें कशाला ?—पण पलीकडे तर गेलेच पाहिजे. सारा गांव दीनासारखा मदतीच्या अपेक्षेनें त्यांच्या होडीकडे पहात बसला असेल. गांवच्या धन्याने बोलावून आणून त्यांना आज्ञा केली....पण माणसांपैकीं कुणी कमी व्हायचें ? झुंझारांनीं ? हो झुंझारांनींच—मग सुकाणूं कोण धरणार ? आवडी बसेल सुकाणूवर, छे ! छे ! आवडीला सुकाणूवर बसविलें कीं होडीचा नाश झालाच म्हणून समजावें. त्या अजाण पोरीला हें काम कसें निभणार ?.... कोळ्यांनीं ? मग

वल्ही कोण मारणार ? दोघे कोळी किंवा झुंझार या तिघांपैकीं कुणालाच मरतां यायचें नाहीं मग आवडीशिवाय....

झुंझारांच्या विचाराची साखळी तुटली आणि वल्हीं मारणाऱ्यांपैकीं एकाच्या लक्षांत ही गोष्ट येतांच त्यांनें झुंझारांना हटकलें. " राव, असं पेंगल्यावानी काय करता ? काळाच्या जबड्यांत हैसा आन् झ्वाप घेतां "

झुंजार शुद्धीवर आले ते आपलें विचारचक्र फिरून सुरू करण्याकरितांच. आवडी बसलेली आहे तशीच तिला नकळत ढकलून देऊं? कां तिला सांगून सवरून ढकलून देऊं? आवडे, आवडे, केवढा बिकट प्रसंग आला आपल्यावर ! ! जन्मोजन्मींच्या वैऱ्यावरसुद्धां हत्यार चालवावयाचें झाल्यास त्याला सूचना द्यावी अशी नीति आहे आणि मी तुझा बाप तुला नकळत तुझा खून करायला तयार झालों आहें ! !--

शेवटीं, झुंझारांनीं तिला सूचना द्यायची पण तिला खरी वस्तुस्थिती कळण्याच्या आंतच तिला ढकलून द्यायची असा विचार मनाशीं कायम केला.

" आवडे, होडग्यांत वज्ज लै झालया ग. "

" मग काय करावं म्हंता बाबा ? "

" आपल्या चौघांपैकीं कुनीतरी एकानं कमी झालं पाहिजे. तवा म्याच कमी व्हावं म्हनतों. मग—"

" काय म्हंता बाबा ? आन् तुमी गेल्यावर होडगं कडेला कसं जानार ? म्या सुकानूवर बसावं म्हंता जनू तुम्ही ?

ते कशापायीं ? म्याच आपली जाती कशी ! ”

त्या तुफान प्रवाहांत मरण्याकरितां आपणहून उडी टाकणें तिला कदाचित् शक्यही झालें नसतें. पण झुंजारांनीं वेळ दवडण्यांत हंशील नाहीं असें पाहून चटकन् तिला कसा-बासारखें पाण्यांत ढकलून दिलें ! !

बराच वेळ डोक्यावर लोंबणाऱ्या आभाळांतून पाव-साची सप्सप् झिमझिम सुरूं झाली. जणूं कांहीं सृष्टी त्या अभागी व निष्कलंक जीवाच्या बलिदानानें होरपळून जाऊन ढळढळा अश्रु ढाळीत आहे किंवा त्या बापाच्या कसाबकरणी-वर शापांचा वर्षाव करीत आहे !

वल्ह्यांची खळबळसुद्धां पावसाच्या सप्सप् आवाजांतून कानाला अस्पष्टच ऐकूं येत होती.—

लोकांच्या जयसूचक आरोळ्यांच्या कल्लोळांत त्यांनीं काळी गांवाकडचा किनारा गांठला.

पाणी उतरलें. लोकांचे व्यवहार पूर्ववत् सुरूं झाले. पावसाळाहि संपला. पण त्या दिवशीं मांजरी गांवच्या गांव—कऱ्यांनीं व इनामदारांनीं शिवबा झुंझारांना निरोप दिला त्यानंतर झुंझार त्यांना फिरून कधींहि दिसले नाहींत. पण नदीकांठानें मळ्यांतून वस्तीला राहणाऱ्या शेतकऱ्यांना मात्र रात्रीं माध्यान्हीच्यावेळीं दोन तेजस्वी ज्योती नदीच्या पाण्यांत ऐन मध्यावर तरंगत असलेल्या दिसतात.

---

## रसिक जागा :- १३

धोंडोपंतांनीं आपल्या कादंबरीचें अखेरचें प्रकरण हातावेगळें केलें ही बातमी दवलाबाद गांवांत हां हां म्हणतां पसरली. त्यांच्या कादंबरीचें हस्तलिखित वाचण्यासाठीं मिळावे या हेतूनें त्यांचे दूरचे व जवळचे नातेवाईक, खरेखोटे स्नेही, भूत व भविष्य कालांतले मित्र, भूत व भविष्यकालांतले लेखक, इत्यादि कितीतरी लोकांनीं त्यांच्या घराभोंवतीं जसा कांहीं गराडा घातला !

अखेर धोंडोपंतांनीं तें हस्तलिखित आपले अत्यंत जानी दोस्त जे इब्राहिमसाहेब त्यांच्या हवालीं केलें.

तेव्हां एकदम इब्राहिम साहेबांच्या भोंवतीं गर्दी जमा झाली. कुणी आपण वर्तमानपत्राचे बातमीदार आहोंत, सबब हस्तलिखित पाहूं द्या, असें म्हणूं लागले. तर कुणी आपण त्या कादंबरीवर टीका लिहिणार आहोंत व ती टीका कादंबरी प्रसिद्ध होण्याच्या आंतच कुठल्या तरी मासिकांत झळकली पाहिजे असा आपला आग्रह असल्याचें सांगूं लागले. कुणी रसिक असल्याचें, कुणी समव्यवसायी असल्याचें तर कुणी

होतकरू लेखक असल्याचें कारण सांगून आपले नंबर लाव-ण्याचा प्रयत्न करूं लागले.

पण इब्राहिम साहेबांनीं एकवार दाढी वरून हात फिरवून खड्या आवाजांत सांगितले--

" ही कादंबरी गांवांत असलेल्या प्रत्येक मुसलमानास वाचावयासा मिळाल्याखेरीज दुसऱ्या कोणासही मिळणार नाहीं."

इब्राहिम साहेबांभोंवतीं जमलेल्या वाकूपंडितांना मनगटे चोळीत घरीं जाण्याखेरीज गत्यंतरच राहिलें नाहीं.

आठ दिवसांत गावांतल्या मुसलमान समाजापैकीं तीन-चार गृहस्थांनीं कादंबरी पाहून घेतली व उरलेल्यास ती पाहण्याची जरूर वाटत नसल्यानें इब्राहिम साहेबांनीं अस्पृश्य वस्तींतून अस्पृश्य पुढारी यल्लापा यांस बोलावून आणून ती कादंबरी त्याच्या हवाली केली.

पण अस्पृश्य समाजांत ती कादंबरी पाहण्यास तीन सुद्धां प्रेक्षक लाभले नाहींत. ज्यानें इब्राहिम साहेबांकडून ती कादंबरी हातीं घेतली त्याचा. मात्र नाईलाज असल्यानें ह्या कादंबरीस त्या समाजात तो एकच प्रेक्षक लाभला.

आठ दिवसानंतर यल्लाप्पानें ती कादंबरी गांवांतल्या बहुसंख्य मराठा समाजाचे पुढारी दौलतराव यांच्या स्वाधीन केली. मराठा समाजांत त्या कादंबरीस बरेच प्रेक्षक उपलब्ध होणार असा रंग दिसूं लागला.

तोंच—

मुसलमान समाजामध्यें त्या कादंबरीबद्दल विलक्षण असंतोष पसरूं लागला. त्यांचें म्हणणें थोडक्यांत असें होतें–

" दवलाबाद गांवामध्यें मुसलमानांची संख्या गांवच्या लोकसंख्येच्या एक चतुर्थांश आहे. हिंदुस्थानांत तर मुसल-मानांची संख्या जवळजवळ एक तृतीयांश आहे. असे असतां धोंडोपंतांच्या कादंबरीमध्यें जितक्या व्यक्तींचें वर्णन आलें आहे त्यापैकीं अवघ्या एक पंचमांश व्यक्तीच मुसलमान आहेत ! अर्थात् हा अन्याय आहे ! मुसलमानांचा अपमान आहे ! "लेखकाला आपल्या कादंबरींत मुसलमानांना संख्येच्या प्रमाणांत जागा देतां येत नव्हत्या तर त्यानें आपल्या हस्त-लिखितांत कोरी जागा ठेवावयाची होती ! आणि ज्याअर्थी त्यानें असें केलें नाहीं त्याअर्थी मुसलमानांच्या भावना दुख-विण्याचा त्याचा हेतू असलाच पाहिजे ! !"

अस्पृश्य तर याहीपेक्षां पुढें गेले.

त्यांनीं आपली एक प्रचंड सभा भरविली. आणि त्या सभेंत यल्लाप्पानें प्रतिज्ञेवर सांगितलें: —

" धोंडोपंताच्या कादंबरींत अस्पृश्यांना ' अस्पृश्य ' असें म्हणण्यांत आलें आहे. हा धोंडोपंताचा अक्षम्य गुन्हा आहे. कादंबरीमध्यें किती अस्पृश्यांचें वर्णन आहे, आणि ज्या ज्या अस्पृशांचें वर्णन आहे त्यांची संख्या अस्पृशांच्या लोक-संख्येच्या प्रमाणांत आहे किंवा नाहीं या विषयीं निश्चित असें कांहींच अनुमान करतां येत नसलें तरी त्या कादंबरींत अस्पृ-

श्यांना योग्य तेवढी जागा राखून ठेवण्यांत आली नसली पाहिजे हें उघड आहे. म्हणूनच सर्व अस्पृश्यांनीं त्या कादंबरीचा, त्या लेखकाचा व एकंदरींत सर्व स्पृश्य हिंदूचाच निषेध केला पाहिजे. ''

अस्पृश्य व मुसलमान यांच्यामधील ही जागृति पाहिल्यावर गांवातले इतर समाज थोडेच निद्रिस्त राहणार ? त्यांच्यापैकीं बहुतेकांनीं ती कादंबरी पाहिली देखील नव्हती पण ज्या अर्थीं इतर समाज तक्रार करीत आहेत त्या अर्थीं आपणही तक्रार केली पाहिजे एवढाच त्यांचा हेतू असे.

पण हें प्रकरण केवळ जातीं--जातींपुरतेंच मर्यादित राहिलें नाहीं. या प्रकरणाच्या आगींत वर्गकलहाचें राकेल पडलें व थोड्याच वेळांत त्या भयंकर वणव्यांत सबंध गांव सांपडला. ' काळ्या ' पेशावाल्यांनीं वर्गकलहाचा मुद्दा उकरून काढला. त्यांचें म्हणणें असें कीं, ज्याअर्थीं धोंडोपंतासारख्या पांढरपेशावाल्यानें हीं कादंबरी लिहिली आहे व ज्याअर्थीं सध्यांच्या कादंबऱ्या पांढरपेशा वर्गासंबंधानेंच असतात त्याअर्थीं धोंडोपंताच्या कादंबरींतहि पांढरपेशालाच प्राधान्य दिलें असलें पाहिजे. आणि काळ्या पेशाला दूर लोटलेलें असलें पाहिजे.

वर्गकलहाचें राकेल जातीजातींच्या भांडणांत पडतांच सबंध गावांत कलहाचा एकच हलकल्लोळ माजला. शेंकडों लोक दगड लाठ्या वगैरे घेऊन धोंडोपंताच्या घराभोंवतीं जमले.

बिचारे धोंडोपंत भयभीत होत्साते दार बंद करून घेऊन घरांत दडून बसले. तेव्हां बाहेर जमलेल्या लोकांचें कांहीं चालेना. अखेर गावांतल्या निरनिराळ्या समाजांतील प्रमुख पुढाऱ्यांचें एक शिष्टमंडळ बनविण्यांत आलें. आणि त्या शिष्टमंडळानें धोंडोपंतांच्या दारांत उभें राहून त्यास मोठ्यानें विचारलें:—

"तुम्ही कादंबरी जाळण्याची परवानगी देत असाल तर आम्ही लागलीच परत जाऊं."

आपल्या तत्वाकरतां देह जाळून घेणाऱ्या क्रॅन्मर, लॅटिमर, डडले इत्यादिकांचें धैर्य धोंडोपंतांच्या आंगीं नसल्यानें त्यानीं आंतून ओरडून सांगितलें—

"जाळून टाका."

धोंडोपंतांची परवानगी मिळतांच पुढारी व त्यांच्यामागोमाग लोक पळाले आणि गांवाबाहेरच्या मैदानांत जमा झाले. त्या ठिकाणीं तात्पुरत्या तयार केलेल्या व्यासपीठावर उभे राहून इब्राहिमसाहेबांनीं कादंबरीचें हस्तलिखित हातीं धरलें. अस्पृश्य पुढारी यल्लापा यानें काडी लावली. क्षणार्धांत हस्तलिखिताच्या कागदांनीं पेट घेतला आणि पांचच मिनिटांत त्या कागदांची राख झाली व ती वाऱ्यावर उडूं लागली. तेव्हां कुठे लोकांचा राग शांत झाला व लोक घरीं परतले.

अशा रीतीनें एका उत्कृष्ट कलाकृतीला महाराष्ट्र कायमचा पारखा झाला.

---

## वेडे कोण ? :--१४

यंदाच सनद घेतलेला तो एक तरुण वकील होता. बाहेर लावलेल्या पाटीखेरीज वकीलीच्या दुसऱ्या कोणत्याहि खुणा त्याच्याजवळ सांपडण्यासारख्या नव्हत्या. त्याच्याकडे पक्षकार येत नव्हते. कोर्टांत त्याचें नांव पुकारलें जात नव्हतें; आणि कारकुनाची ब्याद त्यानें लावून घेतलेली नव्हती. त्याच्या खोलीबाहेर लटकणारी ती पाटी काढून टाकली तर त्याला वकील म्हणण्याची कुणाचीहि छाती नव्हती. दिसा–यला तो कॉलेजांतल्या विद्यार्थ्यासारखाच होता.

वकिलीची सनद त्याच्या घरीं आली, त्या वेळेपासून त्याचें विद्यार्जन सुटलें होतें तरी त्याने गृहस्थाश्रमांत मात्र प्रवेश केलेला नव्हता. स्त्री-जातीविषयीं त्याला तिरस्कार वाटत होता. आणि तो तिरस्कार वाटण्यासारखें तसेंच कांहीं जबर-दस्त कारण घडून आलेलें होतें असें तो म्हणत असे. स्वतः आमरण अविवाहित राहण्याचा आणि शक्य तर देशसेवा करण्याचा त्याचा निश्चय होता.

त्याच्या शेजारच्या खोलींत एक गृहस्थ रहात होता.

गृहस्थ म्हणजे 'गृहस्थ' नव्हता तो. बी. ए. च्या परीक्षेस बसूं इच्छिणारा तो एक विद्यार्थी होता. प्रत्येक महिन्याच्या पहिल्या तारखेस वडिलाकडून मनिऑर्डर येत असल्यानें व्यवहाराची झळ लागण्याचा प्रसंगच अजून त्याच्यावर आलेला नव्हता. आनंदी आणि उमदा स्वभाव, तारुण्य, सौख्य, इत्यादि सर्व गोष्टींची त्याच्यावर खैरात झाली असल्यानें आणि त्या खैरातीला अननुभवाची जोड मिळाली असल्यानें त्याच्या महत्वाकांक्षा, त्याचे मनोरथ, त्याचीं स्वप्नें हीं सर्वच बेताल होऊं पहात होतीं.

अलीकडे हा विद्यार्थी तारुण्यसुलभ अशा प्रणयांत गुरफटूं लागलेला होता. कपड्याच्या, वागण्याच्या आणि बोलण्याच्या बाबतींत प्रगट होणारी त्याची मुळचीच चोखंदळ वृत्ति या प्रणयामुळें उतूं जाण्याच्या बेतास आलेली होती. देशी बोलपटांतील प्रणय भावनेनें भरलेलीं गाणीं, आणि पाश्चात्य बोलपटांतील उत्तमोत्तम नटींचीं नांवें तर त्याच्या जिभेवर अष्टोप्रहर नाचतच. पण कधीं कधीं कुठें तरी वाचलेलें किंवा ऐकलेलें 'पुरुष हा स्वत: एक व्यवहारी अपूर्णांक आहे. स्त्रीच्या मदतीनेंच तो संपूर्ण होतो.' अशा तऱ्हेचें तत्वज्ञान बोलून दाखविण्याइतकीहि त्याची मजल गेलेली होती.

शेजारी-शेजारी राहणाऱ्या या दोन जीवांच्या जीवन क्रमांत आणि स्वभावांत इतकी भिन्नता होती. तथापि ते दोघेही एकमेकांकडे नेहमीं जात येत. त्यांचा दोघांचा

स्नेहही होता. आणि एखाद्या वेळेस ते तासतास गप्पाहि मारीत असत.

त्या गप्पांची सुरवात खेळीमेळीनें झाली तरी अखेर मात्र कधीं भांडणानें होई. कारण दोघांची जीवनाकडे पहाण्याची, स्त्री–जातीकडे पहाण्याची, एकंदर दृष्टिच भिन्न होती.

असें भांडण झालें कीं, ते दोघेहि एकमेकांकडे जाणें वर्ज करीत बोलणें वर्ज करीत पण निकटचा शेजारधर्म पडल्यामुळें एखाद्या क्षुल्लक निमित्तानें तरी का होईना पण त्यांना एकमेकांशीं बोलणें भाग पडे. मग फिरून पूर्वीचें सारें बाजूस ठेवून ते एकमेकांकडे जात–येत, स्नेह दाखवीत आणि प्रसंगीं गप्पाहि मारीत बसत.

अशा तऱ्हेचा त्यांचा जीवनक्रम कित्येक दिवस चाललेला होता.

* * *

एके दिवशीं रात्रीं क्लबांतून जेवण उरकून 'विद्यार्थी' मजकुराची स्वारी एका हिंदी बोलपटांतील एक प्रणयगीत गुणगुणत आपल्या खोलींत प्रवेश करती झाली. खोलींत येतांच त्यानें आरामखुर्चीवर आपला देह टाकून दिला आणि मोठ्यांदा हांक मारली—" वकील साहेब ! "

वकीलसाहेबांकडून कांहींच उत्तर आलें नाहीं. तेव्हां त्यानें फिरून विचारलें, " वकीलसाहेब आहेत ना खोलींत ?"

" आहे, खोलींत आहे आणि जिवंतहि आहे. "

वकीलसाहेबांनीं उत्तर दिलें.

" जिवंत आहांत तर मग इथपर्यंत येण्याचे श्रम घ्याल का ?" विद्यार्थी मजकुरांनीं विचारलें.

थोड्या वेळानें आपल्या तैलाविहीन केसांच्या तळाशीं असलेलें डोकें खाजवीत वकीलसाहेबांनीं प्रवेश केला.

" का ? वकीलसाहेब एवढे वैतागलात का ?"

" झालं तसंच एक कारण !" दुसऱ्या एका खुर्चीवर बसत वकीलसाहेबांनीं उत्तर दिलें.

" काय कारण झालं बुवा ?"

" झालं असंच कांहीं तरी."

" मग आम्हाला सांगण्यासारखं नाहीं कीं काय ? तसं असेल तर राहिलं. बोललों तेंच चुकलों म्हणा कीं."

" छे ! छे ! तसं नाहीं. आपलं एक कारण झालं अन् डोकं थोडं तापलं इतकंच."

" तें कारण कोणतं, हेंच तर आम्ही विचारतों आहोंत."

" कारण म्हणजे इतकंच कीं, आम्हाला एक मुलगी दाखवायला आणली होती."

" मग दाखवायला आणलेली मुलगी पहायची सोडून तुम्ही डोकं तापवून घेतलंत ?"

" अहो, पण आमरण अविवाहित राहण्याचा माझा निश्चय आहे ना ? शिवाय माझ्या मतें स्त्रीजात म्हणजे-"

"—पृथ्वीवरच्या देवता आहेत, असंच ना ?"

"माझ्या मताला ही भलती मुरड घालून तुम्ही माझ्या रागाच्या आगींत रॉकेल ओतीत आहांत !"

" असं का ? असं असेल तर आम्ही आमचे शब्द परत घेतों. नाहीं तर आग भडकून सारं पुणं जळून जायचं कदाचित् !"

विद्यार्थी मजकुराच्या या शब्दांनीं वकील साहेबांचा राग अनावर होऊन त्यांच्या तोंडून शब्द देखील उमटेनासे झाले. आतां जास्त ताणण्यांत अर्थ नाहीं हें पाहून विद्यार्थी-मजकूर समजुतीच्या स्वरांत म्हणाले,

" वकीलसाहेब, अशी माथ्यांत राख कां म्हणून घालून घेतां ? जग किती सुंदर आहे ! आणि या सुंदर जगांतील तरुण सुंदर स्त्रिया म्हणजे...."

"या तरुण सुंदर स्त्रियांबद्दल माझं मत काय आहे हें अगोदर ऐका. कुठल्याशा कवीनं स्त्रियांबद्दल म्हटलेलं आहे-'हृदयाचा सुंदरसा गोष्ट गुंफिती ...पदर पदर परि शेवटीं तुटत तुटत जाई,' अशी त्यांची कृति असते. या ओळींतून त्या कवीनं माझं मत अगदीं सुंदर रीतीनें प्रगट केलेलं आहे."

" अहो, या ओळी स्त्रियांच्याबद्दल नाहींत. या ओळी पुरुषांच्याबद्दल आहेत. आणि हें पद्य गडकऱ्यांनीं आपल्या भावबंधन नांवाच्या नाटकांत नायिकेच्या तोंडीं घातलेलं आहे."

" तरी हरकत नाहीं. पण या ओळींतून स्त्रियांच्या-

बद्दलचं माझं मत सुंदर रीतीनं प्रगट झालेलं आहे."

"पण स्त्री--जातीवर तुमचा एवढा राग कां? त्याला कांहीं कारण आहे कां?"

"कारण?....तसं आहे थोडसं."

"मग सांगून टाका ना लागलीच. तुमचीं सगळीं मतं अन् त्या मतांचीं कारणं कळलेलीं असलीं म्हणजे तुमच्या बरोबर बोलायला ठीक पडेल, म्हणून आमचा हा आग्रह."

"मी बी ए. च्या वर्गांत होतों तेव्हां प्रिव्हिअसच्या वर्गांत एक मुलगी होती...."

"अहो, प्रिव्हिअसच्या वर्गांत मुली असायच्याच. म्हणून का तुमचा स्त्रियांवर राग? भले बहाद्दर!"

"पण शेवटपर्यंत ऐकून तर घ्याल ना? ती मुलगी प्रिव्हिअसमध्यें होती आणि मी सीनिअर बी. ए. च्या वर्गांत होतों. पुढं काय झालं त्याचं वर्णन करीत बसत नाहीं. पण थोडक्यांत सांगायचं म्हणजे मी तिच्यावर प्रेम करीत होतों. तिच्याबद्दल मी वेडा झालों होतों. अगदीं खरोखरीचे वेडा झालों होतों. शेवटीं मीं तिला लग्नाबद्दल विचारलंहि. पण तिनं मला सपशेल फसवलं आणि माझी फजिती केली. पुढं साऱ्या कॉलेजांत मी एक थट्टेचा विषय होऊन राहिलों होतों. त्या वेळेपासून ठरवून टाकलं कीं मरेपर्यंत लग्न करायचं नाहीं. आणि स्त्रीजात म्हणजे—"

"हरामखोर, असंच ना? ही म्हण तर जुनीच आहे.

पण कायहो वकीलसाहेब, एका व्यक्तीच्या स्वभावाचा परिणाम दुसऱ्या व्यक्तीवर कितपत होणें शक्य आहे ? आणि तो परिणाम किती काळ टिकणं शक्य आहे ? त्या प्रिव्हिअसमधल्या मुलीनं तुमच्या मनावर फारच परिणाम केलेला दिसतो. तिच्याबद्दल तुम्ही अगदीं वेडे झाला होतां, नाहीं का ? अगदीं खरोखरीच वेडे झाला होतां का ? तुमचं तें वेड अजूनहि नाहींसं झालेलं दिसत नाहीं ! वेड्या मनुष्याशिवाय आमरण अविवाहित राहण्याचा निश्चय कोण करील ? आणि स्त्रीजात तेवढी निमकहराम असं तरी कोण म्हणेल ? "

" आम्ही वेडे ! अन् तुम्ही मोठे दीडशहाणेच दिसतां ! आम्ही स्त्रियांना निमकहराम म्हणतो आणि तुम्ही काय म्हणतां ? त्यांना देवता म्हणतां– नाहीं कां ? एखादी देवता भेटली आहे ? एरवी स्त्रियांचं वकीलपत्र—"

" वकीलपत्र घेण्याची सनद तुम्हांला मिळालेली आहे. आम्ही तर अजून बी. ए देखील होणार आहेंत ! "

" 'वकीलपत्र' शब्द सोडून द्या. पण स्त्रियांची जी एवढी तरफदारी तुम्हीं चालविली आहे तिचं कारण आम्हाला समजूं द्या ना ? आमचीं मतं अन् त्या मतांचीं कारणं तुम्हांला समजायला हवींत अन् तुमचीं मतं अन् त्या मतांचीं कारणं आम्हाला समजायला नकोत होय ? द्या ना त्या देवतेचं नांव ? "

" नांव घेऊं ? अहो, आतां कुठं लग्नाच्या दिशेनें

बारा वाहूं लागला आहे. अन् इतक्यांत नांव घेऊं ?"

"बरं नांव घेऊं नका. नांव सांगा."

"कालिंदी तळवलकर. आमच्याच वर्गांत—"

"काय म्हणालात ? कालिंदी तळवलकर ? अहो, तिनंच मला फसवलं. तिच्यावर तुम्ही प्रीती करतां ? मूर्ख आहांत ! वेडे आहांत ! गाढव आहांत ! —आतां कमाल झाली ! तिनं तुम्हांला जाळ्यांत पकडलं ? —छे बसवत नाहीं इथं. आम्ही आमच्या खोलींत जातो. कालिंदी त-ळ-व-ल-क-र मूर्ख ! वेडे ! गाढव !...."

दुसऱ्याच दिवशीं विद्यार्थिमजकुरांनीं आपली खोली बदलली.

त्यांच्या स्नेहाचा पाया जो शेजारधर्म तोच उखडला गेला.

* * *

वकीलसाहेबांचा अविवाहित राहण्याचा निश्चय कधींच बाजूला राहिला आणि ते विवाहबद्ध झाले. विद्यार्थी—मजकुरांचा विवाह कालिंदीशीं झाला नाहीं. ते अद्याप अविवाहित आहेत; आणि आमरण अविवाहित राहण्याचा निश्चय करण्याच्या बेतांत आहेत. असें असूनसुद्धां त्या प्रसंगीं त्या मित्रांनीं एकमेकांना वेडेपणाचा जो अहेर केला त्यायोगें त्या दोघांचींहि मनें दुखावलीं गेली आणि अजूनहि त्यांची व्हावी तशी दिल-

जमाई नाहीं. काळाच्या ओघांत जुन्या कटु आठवणींचें निर्माल्य सोडून द्यायचें बाजूस ठेवून, त्या निर्माल्यालाच ताजीं फुलें समजून हृदयाशीं कवटाळणारे ते दोघेहि एका अर्थी वेडेच नव्हेत कां ?



## ज्ञान आणि अज्ञान : :— १५

आणि त्यानंतर मला त्या गृहस्थाची हकीगत आठवली.

तो गृहस्थ म्हणजे नेपोलिअन बादशहाचा रणांगणावरील केवळ उजवा हात असा मार्शल बर्थिअर होय. आणि त्याची हकीगत म्हणजे अशी——

——नेपोलिअन बादशहानें ज्या विख्यात मोहिमा हातीं घेतल्या आणि ज्यांच्या योगानें त्याच्या कीर्तीचा परिमळ जगभर पसरला त्या मोहिमा आखण्यांत त्याला मार्शल बर्थिअरची अतिशय मदत झाली. मोहिमेसंबंधीं एखादि अचाट कल्पना नेपोलिअनच्या मनांत स्फुरावी, ती कल्पना त्यानें बर्थिअरपुढें मांडावी, मग त्यानें व बर्थिअरनें शेंकडों नकाशे पुढें पसरावेत, हातीं कंपास घ्यावा आणि त्या मोहिमेचा आराखडा तयार करावा. इतकेंच नव्हे तर मोहीम सुरू झाल्यावर नेपोनिअनचे हुकूम इष्टस्थळीं बिनचूक पोहोंचवावेत, दिलेल्या हुकुमाप्रमाणें सैन्याच्या आणि सरदारांच्या हालचाली घडवून आणाव्यात, हीं कामें बर्थिअरचीं असत. मारेंगो, आस्टरलीड्झ, जेना, व्हिएन्ना,

इत्यादि ठिकाणीं नेपोलिअननें शत्रूंवर जे प्रचंड विजय मिळविले त्यांतील बरेचसें श्रेय मार्शल बर्थियरच्या वांट्यास जातें, असा इतिहासकारांनीं निर्णय दिलेला आहे. नकाशांच्या अथांग जाळ्यांतून बरोबर मार्ग काढण्यांत आणि 'जनरल स्टाफ' चा मुख्य या नात्यानें हुकुमाची तालिमी करण्यांत मार्शल बर्थिअर केवळ अद्वितीय होता. म्हणूनच नेपोलिअन बोनापार्ट बादशहा झाला त्या वेळीं त्यानें ज्या ज्या कर्तबगार पुरुषांना मार्शलच्या पदावर चढविलें त्यांत बर्थिअर पहिला होता.

पण हा कर्तबगार पुरुष आपलें नकाशाचें क्षेत्र किंवा युद्धशास्त्राचें क्षेत्र सोडून दुसऱ्या क्षेत्रांत गेला कीं निव्वळ हास्यास्पद होत असे. देखणेपणाची देणगी त्याला मिळालेली नव्हती. उलट तो बराच कुरूप होता. आणि आपला कुरूपपणा कपड्याच्या झकपकीनें झांकण्याचा वेडा नाद ऑलिव्हर गोल्डस्मिथ या प्रसिद्ध इंग्लिश कविप्रमाणें त्यालाहि होता. यामुळें होई काय कीं तो अधिकच हास्यास्पद ठरे. नेपोलिअन बादशहा आपल्या वैभवाच्या शिखरावर असतां, बार्थिअरनें एकदां शिकारीचा बेत आंखला. एखाद्या बड्या मोहिमेची आंखणी जशी त्यानें आजवर केलेली होती तशीच या शिकारीच्या बेताचीहि केलेली होती. बरोबर लोक किती घ्यायचे, सामान किती घ्यायचें, बादशहानें केव्हां निघावयाचें,

इत्यादि लहान मोठ्या गोष्टींचा पक्का आराखडा. त्यानें तयार केला होता आणि त्या आराखड्याप्रमाणें निम्में अधिक काम होऊन ऐन शिकारीची वेळ येऊन ठेपली. शिकार करण्यासाठीं कांहीं जनावरें पिंजऱ्यांतून त्यानें अगोदरच जंगलांत नेऊन ठेवली होती. पण तीं सगळीं जनावरें अतिशय माणसाळलेलीं होतीं. आणि शिकारीच्या वेळीं जेव्हां त्यांना पिंजऱ्यांतून बाहेर काढून मोकळें सोडण्यांत आलें तेव्हां तीं जनावरें दूर न पळतां शिकाऱ्यांकडेच धांवून आलीं आणि त्यांच्या अंगाभोंवतीं नाचूं लागली! बर्थिअरनें येवढ्या श्रमानें आखलेला सगळा बेत निव्वळ हास्यास्पद झाला. स्त्रियांच्या समाजांत कसें बोलावें आणि कसें वागावें याची तर बिचाऱ्याला जन्मभर कधींच कल्पना आली नाहीं. त्यामुळें मार्शल बर्थिअर म्हणजे स्त्रियांच्या अघळपघळ थट्टेचा एक कायमचा विषय होता.

मार्शल बर्थिअरचें नांव आणि ही हकीगत आठवायला एक कारण झालें.

कचेरींतून मी नुकताच परत घरीं आलों होतों. तेव्हां अगदीं चिडक्या मनःस्थितींत होतों हें विस्तारानें सांगायला नकोच. त्यांतून ते दिवस होते महिना अखेरचे. अपुऱ्या प्राप्तिवर शहरांत दिवस काढणाऱ्या मध्यम-वर्गांतल्या मिळ-वित्या पुरुषांचे महिन्याअखेरचे दिवस किती आणि कसे जिकि-रीचे जातात याचा अनुभव पुष्कळांना असतोच. महिना अखेर

असल्यानें प्रगति–पुस्तकावर सही करून आणण्यासाठीं माझ्या धाकट्या भावाला शाळेंत मास्तराकडून तंबी मिळालेली होती. महिन्याच्या मुदतींत त्याची प्रगति तर काहींच झालेली नसून परागति मात्र खूप झाली होती आणि त्या पुच्छ–प्रगतिबद्दल माझ्याकडून वाक्ताडन होईल या भीतीनें त्यानें मला प्रगति–पुस्तक दाखविण्याचें महिना अखेरपर्यंत टाळलें होतें. पण शेवटीं मास्तराकडून तंबी मिळतांच त्याचा नाईलाज झाला. आणि त्यानें माझी [ पालकाची ] सही घेण्याकरतां प्रगति-पुस्तक माझ्याकडे आणलें. प्रगति–पुस्तकांत नमूद केलेले निर-निराळ्या विषयांतलि त्याला मिळालेले गुण मी पाहिलें. भाषा विषयांत आणि इतिहास–भूगोलात त्याला चांगले गुण मिळा-लेले होते. पण गणित विषयांत मात्र तो पुरा नापास झालेला होता. गणित विषयांतल्या त्याच्या कच्चेपणाबद्दल माझ्या त्या चिडक्या मनःस्थितींतच मी त्याला वाक्ताडन केले आणि सही करून पुस्तक परत दिलें.

थोड्या वेळानें मी फिरायला गेलों. कांहीं कांहीं माणसें मनाची इतकी मवाळ असतात कीं कोणतेंही कठोर कृत्य— फार काय, कठोर शब्द सुद्धां त्यांच्याकडून बोलले जात नाहींत आणि एखाद्या वेळेला ते गेलेच तर त्या शब्दांसंबंधीं पुढे विचार करीत राहून तीं माणसें स्वतःचा मनस्ताप करून घेत असतात. मृदु मनाच्या माणसांपासून इतरांना सुख होत असेल पण त्यांच्या स्वतःच्या आयुष्यांत मात्र सुखापेक्षां दुःखच अधिक

अततें. अशा तऱ्हेच्या माणसांपैकींच मी एक होतों. त्यामुळें माझ्या भावास मी जें बोलून गेलों त्याबद्दल राहून राहून माझ्या मनांत विचारतरंग निर्माण होऊं लागले आणि त्या तरंगांच्या मारामुळें माझ्या अंतःकरणास वेदना होऊं लागल्या.

माझ्या स्वतःच्या शालेय आयुष्याची मला आठवण झाली. माझ्या धाकट्या भावाप्रमाणेंच माझेहि गणित विषया-खेरीज इतर सर्व विषय चांगले असत. आणि गणित विषयांत मिळणाऱ्या अपयशाबद्दल मला वडिलांकडून बोलणें सहन करावें लागे. त्यावेळीं माझ्या मनास ज्या वेदना होत त्या मला आठवल्या. गणित विषयांत प्राविण्य मिळविण्याच्या हेतूनें मी पुष्कळ परीश्रम घेतले होते पण माझा हेतु कधींच सिद्धीस गेला नाहीं, आणि केवळ परीक्षेंत उत्तीर्ण होण्यापुरतेच गुण मिळवून मला स्वस्थ बसावें लागलें. एकाद्याची बुद्धीच एकाद्या विषयांत चालत नाहीं. मग तो बिचारा प्रयत्नाची शिकस्त करो किंवा अन्य कांहीं करो.

प्रयत्न करूनहि एखाद्याला एकादा विषय साध्य होत नाहीं हें सिद्ध झाल्यावर फिरून त्यानें तो विषय साध्य करून घेण्याचा प्रयत्न करीत राहणें किंवा त्यानें ते प्रयत्न करावेत म्हणून त्याच्यावर जुलूम करणें म्हणजे निव्वळ अन्यायाचेंच नाहीं कां ? शिवाय अशा तऱ्हेनें किती तरी माणसांच्या बुद्धीचा शक्तीचा आणि संपत्तिचा अपव्यय होत असेल तो निराळाच !

पण मनुष्यानें अनेक विषयांत पारंगत असावे अशी

अपेक्षा तरी आपण कां करावी? अनेक विषयांत ज्यांची बुद्धि सहज लीलेनें चालते असे नेपोलिअन बोनापार्टासारखे पुरुष शतकांत एकदोनच. ( शिवाय त्यांची बुद्धिहि सर्वच विषयांत चालते असें नाहीं. ) ते अपवाद म्हणून आपण सोडून दिले पाहिजेत. सर्व साधारण मनुष्याच्या बुद्धिचें मोजमाप लक्षांत घेतलें तर असली अपेक्षा निव्वळ चुकीची आहे. व्यास किंवा ॲरिस्टॉटल यांची बुद्धि अनेक विषयांत चालत असे पण त्यांची बुद्धिमत्ता सामान्य प्रतीची नव्हती. शिवाय त्यांच्या कालांत आजच्या इतकी ज्ञानाची वाढहि झालेली नव्हती.

आजकाल मनुष्याच्या ज्ञानाचें क्षेत्र इतकें अफाट झालेलें आहे कीं त्या ज्ञानाच्या एकाद्या शाखेचें संपूर्ण ज्ञान संपादन करावयास सामान्य बुद्धिमत्तेच्या मनुष्यास सबंध जन्महि पुरावयाचा नाहीं. अशा काळांत मनुष्यापासून अनेक विषयांच्या पारंगततेची अपेक्षा करणारे किंवा आपण अनेक विषयांत पारंगत आहोंत असे समजणारे बिचारे मानव प्राणी कींव करण्याच्याच योग्यतेचे आहेत. अनेक विषयांचें संपूर्ण ज्ञान संपादणें ही गोष्ट आजच्या युगांत सामान्य मनुष्याच्या दृष्टीनें अशक्य आहे. अनेक विषयांचें संपूर्ण ज्ञान मिळवूं इच्छिणाऱ्या अभ्यासकाला कोणत्याच विषयाचें पुरें ज्ञान होणार नाहीं. त्यापेक्षां एकाद्या विषयाचें पूर्ण ज्ञान आणि अनेक विषयांचें साधारण ज्ञान ही स्थिति अधिक चांगली. व्यवहारांत वागतांना आपलें अनेक वेळीं हंसें होतें या गोष्टीबद्दल मार्शल

वर्थिअर यास वाईट वाटत होतें कीं नाहीं हें मला माहीत नाहीं. पण जर त्याला वाईट वाटत असेल तर तें मात्र वाईट आहे असेंच मी म्हणेन. तसेंच चिडक्या मन:स्थितींत मी माझ्या भावाला कांहीं बोलून गेलों असलों तरी प्रसंग येतांच त्याच्या आवडीची एकादि वस्तु त्याला देऊन त्याच्या आनंदांत मी त्याच्यावर केलेल्या शाब्दिक अन्यायाचें परीमार्जन करून घेईन.



## लेखन आणि कुस्ती : :— १६

दिनू हा माझा बाळमित्र. तेव्हां मुंबईहून सुटीनिमित्त मी गांवीं आलों कीं आपणहून मी त्याच्या घरीं जात असे आणि त्याची खुशाली समजावून घेत असे.

गेल्या वर्षी दिवाळीच्या सुटींत मी असाच एकदां त्याच्या खोलीवर गेलों होतों. त्यावेळीं तो बिछान्यावर पडलेला होता. त्याचे डोळे खोल गेले होते. बरेच दिवस दाढी न केल्यामुळें त्याचा चेहरा भेसूर दिसत होता. अशक्तपणामुळें त्याला हातापायांची हालचालहि फारशी करतां येत नव्हती.

" दिनू, आजारी का आहेस ?" मी विचारलें.

" होय. "

" किती दिवस झाले ? "

" जवळजवळ महिना होत आला. "

" कशानं रे आजारी आहेस तूं ? "

" अनेक कारणं आहेत त्याला. "

" पण मला सांगशील कीं नाहीं कांहीं ? "

" कां नाहीं सांगणार? पहिलं कारण म्हणजे आर्थिक परिस्थिती. मी ' महाराष्ट्र बुक डेपो ' मध्यें नोकर आहे हें तुला माहीतच आहे. सध्यां मला ते पंधरा रुपये पगार देतात. आई नी तीन भावंडं यांचा प्रपंच कसा चालवायचा या पंधरा रुपयांत? दुसरं कारण म्हणजे मानसिक परिस्थिती. माझा स्वभाव थोडा महत्त्वाकांक्षी आहे, हें कांहीं तुला नव्यानं सागायला नको. गरिबीमुळं शिक्षण सोडून देऊन नोकरी पत्करावी लागली म्हणून स्वभाव कांहीं बदलत नाहीं. पुस्तकाच्या दुकानांतील नोकरी. लेखकांना कीर्ती आणि थोडाबहुत पैसा मिळवून द्यायची एजन्सीच म्हणेनास ती. अशा ठिकाणीं राहिल्यामुळें मलाहि वाटूं लागलं कीं आपणहि लेखक व्हावं, लेख लिहावेत, पुस्तकं लिहावीत, नांव मिळवावं, पैसा मिळवावा. "

" मग काय केलंस तूं? "

" लेख लिहायला सुरवात केली. लेख प्रसिद्ध मासिकाकडे पाठविल्यास लौकर प्रसिद्धी मिळतें म्हणून लिहिलेले लेख अशा मासिकांकडे पाठविले. सगळे लेख परत आले. मग या मासिकाकडे पाठविलेले लेख त्या मासिकांकडे पाठविले. तरीहि सगळे लेख परत आले. फिरून नवे लेख लिहिले. ते पाठविले. तेहि परत आले. एक लेख पाठवावयाचा, लेख परत मिळण्याकरतां सोबत पोस्टेज ठेवायचं, म्हणजे एका लेखाला सुमारे तीन आणे खर्च येतो. असे कित्येक लेख पाठ-

व्हायचे आणि प्रत्येक लेख कित्येकदां तरी परत यायचा. या भानगडींत माझे दरमहा तीन–चार रुपये खर्च व्हायला लागले. लेख लिहायला, त्याची फेअर कॉपी करायला, मी रात्रीच्या रात्री जागून काढल्या कारण मला दिवसा लेख लिहायला कधीं फुरसदच नसें. इतक्या खटाटोपानं लिहून पाठविलेले लेख परत आल्यावर वाईट वाटल्यावांचून कसें राहील ? माझ्या लेखांच्या पायीं पगारांतल्या तीन–चार रुपयांना चट्टा बसायला लागला तेव्हां घरांतल्या मंडळींनींहि माझ्या लिहिण्यावर तोंडसुख घ्यायला सुरवात केली. आईनं तर एकदां परत आलेले लेख चुलींत घालून जाळूनहि टाकले. पराजय, सहानुभूतीचा अभाव, आर्थिक परिस्थिति, अशा अनेक अडचणी माझ्या मार्गांत आहेत. पण मी आशा सोडली नाहीं. अजूनहि माझी महत्व-कांक्षा नाहींशीं झालेली नाहीं. टाकीचे घाव सोसल्याखेरीज देवपण येत नाहीं, हें मी पूर्णपणें जाणून आहे. या आजारी-पणांतून उठतांच मी फिरून लेखणी उचलणार आहे. ”

“ दिनू, तुझ्या महत्वाकांक्षेबद्दल नी प्रयत्नाबद्दल मी तुझे मनापासून अभिनंदन करतों. पण तुला एक सांगू कां ? राग नाहींना येऊं देणार ?”

“ राग ! आणि तो तुझ्याबद्दल ? वेडा आहेस झालं!”

“ मग कांहीं हरकत नाहीं. मला इतकंच सांगायचं आहे कीं कुणी झालं तरी नाशिबाला सतावूं नये. ”

“ म्हणजे तूं तर अगदींच दैववादी दिसतोस.”

" छे! उलट मी पुरा प्रयत्नवादी आहे. पण माणसान प्रयत्न करावयाचे ते योग्य दिशेनं करावेत एवढंच माझं म्हणणं. "

" मग माझे प्रयत्न योग्य दिशेनं चाललेले नाहींत असं कां तुला म्हणायचं आहे? "– दिनू.

" हो " –मी.

" मग माझ्या महत्वाकांक्षेची वाट ? " दिनू.

" नांव मिळवावं एवढीच ना तुझी महत्वाकांक्षा ? "

" हो. "

" नांव मिळवायला लेखन हा एकच मार्ग उपलब्ध आहे काय ? तुझं हाडपेर दणकट आहे. तू आखाड्यांत खेळलेला गडी आहेस. तुझे हात लेखणी धरण्यासाठीं नव्हेत तर करेला पेलण्यासाठी निर्माण झाले आहेत. लेखांच्या पायीं महिन्याला चार रुपये खर्च करतोस त्याऐवजीं तेच रुपये आटीव दूध प्यायला कां खर्च करीत नाहींस ? फडके खांडेकर यांनीं कीर्ती मिळविली आणि गामा–गुंगा यांनीं कमी का कीर्ती मिळविली ? "

दिनू हा सीध्या स्वभावाचा शिपाईगडी होता. माझ्या भाषणानं त्याची तेव्हांच कळी खुलली.

मात्र त्या खोलींत लटकत असलेले साहित्यिकाचे फोटो टेबलावरचें लेखनसाहित्य आणि कपाटांतली पुस्तकें माझ्याकडे रागानें पहात होतीं. उघडच आहे. उद्यांच्या एका साहित्य–

सेवकाला मी साहित्यसेवेपासून परावृत्त करण्याचें पाप करीत होतों !

दिवाळीची सुटी संपली. मी परत मुंबईला आलों.

त्यानंतर सुमारें दोन महिन्यांनीं मला दिनूकडून एक पत्र आलें. पत्रांत त्यानें म्हटलें होतें:—

तुझ्या उपदेशाप्रमाणं वागायला सुरवात केली आहे. त्यामुळें प्रकृतींतहि चांगलाच फरक पडत चालला आहे. आतां एक विशेष गोष्ट सांगायची म्हणजे अशी कीं, आमचा आणि आमच्या पुस्तकविक्या मालकाचा एके दिवशीं चांगलाच खटका उडाला आणि आम्ही तावातावानें दुकान सोडून बाहेर पडलों. पुढचे आठ—पंधरा दिवस बेकारींतच गेले. एके दिवशीं कळलं कीं, आपल्या गांवांतल्या नरोत्तम शेटजींनीं आपल्या कापड दुकानाला लागूनच व्यायामाचीं साधनें विकण्याचं एक नवं दुकान काढलं आहे आणि त्यांना एका माणसाची जरूर आहे. मी लागलीच शेटजींच्याकडे गेलों. आणि दुकानांतल्या नोकरीचा मला अनुभव आहे वगैरे त्यांना सांगायला लागलों. ते म्हणाले—‘ अहो, हें सांगण्याची कांहीं जरूर नाहीं. तुमच्या शरीराकडे पाहतांच आमच्या दुकानीं तुम्हांला ठेवून घेण्याचं मी ठरविलं आहे. व्यायामाचीं साधनं विकायच्या दुकानांतला माणूसहि कसा भरदार पाहिजे. ’ दुसऱ्या दिवसापासून मी कामावर हजर झालों. शेटजींना व्यायामाचा फार षोक आहे. मला ते परोपरीनें उत्तेजन देतात. शिवाय व्यायामाचीं साधनें

सतत डोळ्यासमोर राहिल्यामुळें शरीर कमावण्याची स्फूर्ती होते ती निराळीच. व्यायामाचीं कांहीं उपकरणें शेटजींनीं मला मोफत दिली आहेत. त्यांचा मी योग्य उपयोग करीत असतो. शिवाय पहाटे पांचाला तालमींत जातों तें निराळेंच."

मनुष्य जरी आपल्या गांवापासून दूर असला तरी त्या गांवासंबंधीं त्याला वाटणारें प्रेम कमी कसें होईल? आमच्या गांवांत अशा काय मोठ्या घडामोडी होणार होत्या? पण जें कांहीं कमीजास्त होईल तें आपल्याला कळावें म्हणून मी आमच्या गांवांत निघणारें 'लढाई' हें वर्तमानपत्र मागवीत असें.

पोष्टानें आलेला 'लढाई'चा अंक मी उघडला तोंच एक जाड मथळा माझ्या नजरेसमोर उभा राहिला—

**पांढरपेशा तरुणाचा पराक्रम.**

**दिनकररावांनीं मैदान जिंकलें.**

मी उत्सुकतेनें ती बातमी वाचूं लागलों. दिनूची अब्दुल गफूर नामक एका मुसलमान पहिलवानाशीं कुस्ती ठरली होती. ती कुस्ती शेकडों प्रेक्षकांसमोर दिनूनें मोठ्या कौशल्यानें जिंकली. या विजयाबद्दल त्याला अनेकांनीं बक्षिसें दिलीं होतीं. नरोत्तमशेटजींनीं एक सोन्याची आंगठी दिली होती.

मी लागलीच दिनूला अभिनंदनपर तार ठोकली. यंदाहि दिवाळीची सुटी होऊन मी गांवीं आलों आणि दिनूच्या घरीं गेलों.

त्याच्या खोलीचें स्वरूप पार पालटून गेलें होतें. साहित्यिकांच्या ऐवजीं मल्लांचे फोटो लटकलेले दिसत होते. मध्यभागीं मारुतिरायाची एक भव्य तसबीर दिसत होती. आणि त्या तसबिरीवर ताज्या फुलांचा हार शोभत होता. कोंपऱ्यांत टेबलाच्या ऐवजीं दोन करेले आणि जोड्या दिसत होत्या. कपाटांत पुस्तकाच्या ऐवजीं डंबेल्स आणि चेस्ट एक्स्पांडर दिसत होते.

" अरे, ही काय खोली आहे कीं आखाडा आहे ? " मी हंसत हंसत विचारलें.

" ही खोलीच आहे. पण लेखकाची नव्हे— पहिलवानाची. "

" खरंच दिनू, लेख लिहिण्याच्या वेडाची लहर फिरून कधीं तुला येते कां रे ? "

" छट् ! नांव सुद्धां उच्चारूं नकोस त्या गोष्टीचं माझ्यासमोर. "

आणि त्या गोष्टीचं नांव ऐकल्याच्या पापाचं परिमार्जन म्हणून त्यानें मारुतिरायासमोर उभे राहून एक तोंडांत मारून घेतली आणि साधा नमस्कार न करतां पांच मयूर—दंड ठोकून पहिलवानी पेशाला योग्य असा नमस्कार केला.

---

# खिसे : :— १७

वेल्ससाहेबांनीं आपल्या एका ग्रंथांत मनुष्य जातीच्या प्रगतीला विस्तवाच्या शोधानें कशी सुरवात झाली हें सांगितलें आहे. आजपर्यंतच्या मानवी प्रगतीच्या इतिहासांत या शोधाचें अत्यंत महत्व आहे, हा त्यांचा आग्रह सर्वांनाच मान्य होईल. पण यानंतरच्या मानवी प्रगतीचें त्यांनीं जें सुन्दर चित्र रेखाटलें आहे तें मात्र मला मुळींच पसंत नाहीं. मानवजात प्रगतीच्या वाटेवर आहे असें त्यांच्या प्रमाणें मला वाटत नाहीं. उलट मानवजातीची परागति होत आहे हा माझा समज दृढतर होत चालला आहे. माझ्या मतें मानवी प्रगतीच्या इतिहासांतला विस्तवाचा शोध हा जसा महत्वाचा तसाच मानवी परागतीच्या इतिहासांतला खिशांचा शोध हा महत्वाचा आहे. इतकेंच नव्हे तर मी असेंही म्हणेन कीं विस्तवाच्या शोधानें मानवी जीवनाला जितके फायदे झाले आहेत तितकेच तोटे खिशाच्या योगानें मानवी जीविताचे होत आहेत.

हेंच पहाना—खिशांत आपण जें भरमसाट सामान भरतों त्यांतून आपल्याला हवा असलेला जिन्नस आपल्याला

शोधून काढायच्या कामीं असा कांहीं घोटाळा उडून जातो आणि किती तरी वेळ खर्च होतो ! ! माझ्या खिशांत तर सुपारी, लवंग, कागद, बिलें, हातरुमाल, तपकिरीची डबी, चाकू, हॅन्डबिलें, बॅटरी, किल्या [आणि या सगळ्या जिनसांच्या भरतीला कॉलेजांतल्या पुस्तकाची भर पडली म्हणजे तर विचारूंच नका ] या जिनसांची अशी कांहीं खिचडी होऊन गेली आहे कीं ऐन वेळेस एकादा जिन्नस मला हवा आहे आणि मला तो लागलीच मिळाला आहे असं कधीं झालंच नाहीं.

परवा अशी गंमत झाली-तासाला बसलों असतां प्रोफेसरांनीं कांहीं मजकूर लिहून घ्यायला सांगितला. मी खिशांत पेन्सिल चाचपूं लागलों. पण पेन्सिल राहिली बाजूला आणि तपकीरीची डबी मात्र लागली हाताला ! ! पंधरा मिनिटें शोध करून अखेर पेन्सिल मिळाली नाहीं ती नाहींच. मग संसाराच्या जंजाळाला कावलेल्या एखाद्या गृहस्थानें संसार सोडून वनात पळून जावें आणि स्वस्थ बसून ब्रह्मचिंतन करावें, त्याप्रमाणें मी पेन्सिल शोधण्याचा नाद सोडून दिला आणि हातीं आली त्या तपकीरीच्या डबींतली एक चिमट घेऊन ओढीत मी सबंध तास घालविला.

* * *

आपल्याला हवी असलेली वस्तु खिशांतून शोधून काढ-

तांना आपला किती वेळ वाया जातो याचें मी गणीत केलेलें नाहीं आणि माझ्या हातून तें कधीं शक्यही नाहीं. प्रिव्हिअस होईपर्यंत गणिताचें आणि आमचें वाकडें असल्यामुळें पुढें सुद्धां एखाद्या वेळेस त्याची मदत आम्हांला हवी असली आणि ती मदत मागण्याकरितां आम्ही त्यांच्याकडे गेलों तर आम्हाला नेमका दगा द्यायचा असें त्यानें ठरविल्यामुळें आकडेशास्त्रानें एखादी गोष्ट सिद्ध करण्याच्या भरीस सहसा मी कधीं पडत नाहीं. पण माझ्या ऐवजीं एखाद्या जर्मन प्रोफेसरानें [ आकडे-शास्त्रांत या लोकांचा हात धरणारे लोक जगांत क्वचितच असतील— ] तें गणीत केले तर माझी अशी खात्री आहे कीं मानवी आयुष्याच्या सरासरीच्या सत्तर वर्षांच्या आयुर्मर्यादेंतलीं आठ दहा वर्षें तरी त्याला खर्चाच्या सदरांत अलग काढावीं लागतील. खिशापायीं प्रत्येकाच्या जीवनांतील आठदहा वर्षें सत्कारणीं लागलीं तर अखिल मानव जातीच्या प्रगतीला केवढें प्रचंड सहाय्य होईल याची कल्पना करणें फारसें अवघड नाहीं.

* * *

वेळेचा हा प्रश्न थोडावेळ बाजूला ठेवला तरी देखील खिशांतून सामानाचें केवढें ओझें—ओझें कसलें ? ओझ्याच्या गोण्या ! —आम्हाला सदोदित अंगावर वागवावें लागतें. हिंदु-स्थानांत विमान विद्येचा प्रसार करण्याकरितां सरकार एक योजना तयार करणार आहे म्हणे. पण आमच्या एका पुढा-

त्यानें म्हटल्याप्रमाणें सरकार कधीं कधीं घोडचुका करीत असते. आणि या योजनेचा प्रकार म्हणजे अशीच एक घोडचूक आहे, नाहींतर काय? युरोपियन लोकांच्या खाण्यापिण्याचा बेत आमच्याहून सरस असल्यानें त्यांच्या अंगावर मांस वाढतें आणि त्यांना कदाचित् या योजनेची जरूर असेल. पण आम्हा हिंदवासीयांवर, निसर्गाच्या लाडक्या हिंदवासियांवर दुष्काळदेवतेची कायमची कृपा असल्यानें खाऊनपिऊन आमच्या अंगावर मांस वाढेल ही भीती व्यर्थ आहे. या कारणास्तव आमचीं शरीरें सडपातळ राहिल्यानें, खिशांच्या रूपानें सामानाच्या ज्या गोण्या आमच्यावर आम्ही लादलेल्या आहेत त्या उतरून टाकल्या कीं, विमानाशिवायच आम्हीं हवेंत तरंगायला लागूं. करायचीं काय आहेत आम्हाला तीं विमानं अन् त्या योजना?

० ० ०

खिशांच्या रूपानें सामानाच्या ज्या गोण्या आमच्यावर लादल्या आहेत त्या उतरून टाकल्या तर.... सबंध मानव जातीचें केवढें हित होईल याची कल्पनाच करवत नाहीं. बेकारी तर हां हां म्हणतां नाहींशी होईल. का नाहीं होणार? असं पहा, सुपारी, लवंग, तपकिरीची डबी, इत्यादि सामान तर नेहमींच आपल्याला हवं असतं पण खिसे नसल्यामुळें ते खिशांतून ठेवतां येत नाहीं. मग काय करतां येणं शक्य

आहे? इतकंच करतां येणं शक्य आहे कीं हें सामान पुरविणारे स्टोअर्स ठिकठिकाणीं उघडायचे. असे स्टोअर्स उघडले तर गल्लोगल्लीं, कुंजाकुंजाला, खेड्यांमधून, बाजारहाटांतून हे स्टोअर्स आपल्याला दिसूं लागतील आणि त्यामधून असंख्य माणसें गुंतून राहिल्यामुळें बेकारीला चांगलाच आळा बसेल. बेकारी नाहींशीं झाली, उद्योगधंदे व व्यापार वाढला, आबादीआबाद झाली, रामराज्य झालें!— वेल्ससाहेब, आपण चुकतां आहांत. आपण लिहितां तो "मॉडर्न युटोपिआ" नव्हे, हा "मॉडर्न युटोपिआ"!!!



## ब्रेन-टॉनिक : :- १८

तारीख ३१ मे १९३६ रोजीं पुण्यांत दोन महत्वाच्या गोष्टी घडून आल्या. पहिली महत्वाची गोष्ट म्हणजे मॅट्रिकच्या परीक्षेचा निकाल आणि दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे श्रीयुत बजाबांच्या ब्रेन-टॉनिकचें पहिलें प्रसिद्धीकरण. या गोष्टींचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं असें कदाचित् तुम्हाला वाटेल. पण बजाबांनीं काढलेल्या जाहिरातींपैकीं एका जाहिरातीचा हा नमुना पहा—

> अपूर्व शोध ! विसाव्या शतकातला अपूर्व शोध !!
> सुप्रसिद्ध केमिस्ट बजाबा याचे
> **ब्रेन--टॉनिक.**
> केलेला अभ्यास लक्षात रहातो ! मॅट्रिकच्या परीक्षेत हटकून यश मिळेल. मॅट्रिक पास होऊन कॉलेजात गेला आहात काय ? मग पुष्कळ वेळ अभ्यासाचा त्रास न घेतां कॉलेज लाईफ एन्जॉय करण्याकरिता बजाबाचे ब्रेनटॉनिक घ्या !
> गूण न आल्यास पैसे परत.

ही जाहिरात वाचल्यानंतर मात्र मॅट्रिकच्या परीक्षेच्या निकालाचा आणि केमिस्ट बजाबांच्या ब्रेन-टॉनिकचा जिव्हा-

ल्याच्या संबंध कसा होता हें तुमच्या लक्षांत आलें असेलच. 'नाहीं' म्हणूं नका. नाहींतर केमिस्ट बजाबा तुमच्याकडे आपल्या ब्रेन–टॉनिकची एक बाटली पाठवून देतील !—

मॅट्रिकच्या परीक्षेंत जे कोणी पास झालेले होते, त्यांच्यावर केमिस्ट बजाबांच्या जाहिरातीचा कांहींच परिणाम झाला नाहीं. आणि तो होणेंहि शक्य नव्हतें. कारण पास झाल्याचें कळतांच ते इतके आनंदले होते कीं त्यांनीं बिचाऱ्या बजाबांच्या जाहिरातीकडे लक्षच दिलें नव्हतें.

पण जे कोणी दुर्दैवानें नापास झालेले होते त्यांच्या नजरेस बजाबांची जाहिरात पडतांच त्या दुःखांतहि त्यांना थोडें समाधान वाटलें. बुडत्याला काडीचाहि आधार पुरतो म्हणतात, तो हा असा. आपला मेंदू चांगला नसल्यानें केलेला अभ्यास आपल्या लक्षांत राहिला नाहीं आणि परी–क्षेंत आपल्यास अपयश आलें, अशी त्या दुर्दैवी प्राण्यांची प्रामाणिक समजूत होती. केमिस्ट बजाबांच्या या दिव्यौषधीनें आपला मेंदू सुधारेल आणि चांगलें काम देऊं लागेल असें त्यांच्या दुःखित मनाला वाटत होतें. निदान आमच्या बन्याबापूची तरी विचारसरणी अगदीं अशीच होती.

तेव्हां फिरून अभ्यासाला सुरवात करण्यापूर्वीं बन्यानें एकदां बजाबांच्या दुकानीं जाऊन ब्रेन–टॉनिकच्या दोन बाटल्या खरेदी केल्या. बाटल्या ? बाटल्या कसल्या त्या ? बर-ण्याच होत्या त्या. घेण्याचें प्रमाण दररोज स्वयंपाकाची एक पळी

भरून. दोन बरण्या चार महिने पुरणार होत्या आणि बऱ्यानें तर असा हिशोब मांडला होता कीं बरोबर शेवटचा पेपर द्यायच्या दिवशीं दुसऱ्या बरणींतील शेवटचा भाग घ्यायचा नी परीक्षेला बसायचें.

झालें. दररोज बरण्यांतील मधुर ब्रेन–टॉनिक आस्तें आस्तें कमी होऊं लागलें, बऱ्याचा रोजचा अभ्यास सातआठ तास पढूं लागला. केलेला अभ्यास त्याच्या स्मरणांत इतका राहिला कीं तो झोपेंत बडबडला तरी त्या बडबडींतून 'बसईच्या तहाचीं कलमें' किंवा 'अमेरिकेंतील नद्या'च बाहेर पडत!

इंग्रजीच्या अभ्यासाचा तर त्यानें एक भला मोठा कारखानाच उघडला होता आणि मिळतील तीं 'मार्गदर्शकें' ऊर्फ 'गाईड्स' घेऊन त्यांचें पीठ करण्याचा मोठा उद्योग त्या कारखान्यांत चालत होता. त्या कारखान्यांतील प्रचंड खड-खडाटानें आजू–बाजूचे लोक खवळून गेले आणि एकानें तर थेट नगरपालिकेपर्यंत तक्रार नेऊन भिडाविली. त्याच्या खोलीच्या आसपास कुत्रीं, मांजरें, फिरकेनाशीं झालीं. मात्र त्याच्या खोलीच्या आसपास घोंटाळणाऱ्या 'इतरां'ची संख्या वाढत चालली.

होतां होतां आक्टोबर महिना आला. पुरवणी परीक्षेची तारीख उजाडली. बऱ्यानें भराभर परीक्षेचे कागद हातावेगळे करण्याचें काम चालविलें. पण ऐन वेळीं थोडा घोटाळा झालाच. त्याच्या डोक्याचें आणि हाताचें सहकार्य व्हावें

तसें झालें नाहीं. त्यामुळें डोक्यांतला कांहीं मजकूर डोक्यांतच राहिला आणि हातानें भलताच मजकूर लिहिला !—

तरी देखील त्याला आशा वाटत होती. पण शेवटीं आशेची निराशा झाली. फिरून एकदां त्याच्या नशिबानें दिवाळें काढलें.

वैतागानें त्यानें आपल्या खोलींत पाय ठेवला. समोरच रिकाम्या झालेल्या ब्रेन-टॉनिकच्या बरण्या उभ्या होत्या. त्या पाहतांच बन्याला त्यांचा विलक्षण राग आला. आणि त्या उचलून बाहेर फेकणार तोंच—

एक चमत्कारिक विचार त्याच्या मनांत आला. त्यानें त्या बरण्या तशाच हातीं घेतल्या आणि केमिस्ट बजाबांच्या दुकानाचा रस्ता पकडला.

त्याच्या दुकानापुढें जाऊन उभा राहतों, त्याला जाब विचारतों, माणसें जमवतों, अशा प्रकारचे कितीतरी विचार बन्याच्या संतप्त मस्तकांत थैमान घालीत होते.

शेवटीं एकदां स्वारी बजाबांच्या दुकानाच्या दाराशीं येऊन थडकली. स्वारीनें रस्त्यावरूनच हाक मारली—"बजाबा!"

कावरे बावरे झालेले बजाबा रस्त्यावर आले.

" बजाबा, तुमच्या ब्रेन—टॉनिकचा गूण मला अजीबात आला नाहीं."

" अहो, असं झालं तरी कसं ? "

" अहो, चार महिन्यांपूर्वी तुमच्याकडून मी ब्रेन-

टॉनिकच्या दोन बरण्या नेल्या. चार महिने मरेमरेतों अभ्यास केला. आणि शेवटीं आम्ही नापासच ! तुमच्यां ब्रेनटॉनिकचा आम्हाला काय उपयोग झाला ? तुमच्या ब्रेन-टॉनिकचा आम्हाला काय गूण आला ? गूण आला नाहीं. आतां पैसे परत द्या."

बऱ्याची आरडाओरड चालली असतां रस्त्यांतून जाणारीं दहावीस माणसें त्याच्या भोवतीं जमलीं होतीं.

"गूण आला नाहीं तर पैसे परत द्यायला आमची तयारी आहेच," बजाबा बोलूं लागले– "पण तुम्हांला गूण आला नाहीं, असं म्हणायला पुरावा काय ?"

"पुरावा काय ? मी नापास झालों हाच पुरावा."

"तुम्ही नापास झाला तें कांहीं दुसऱ्याच कारणानं. तुम्हांला ब्रेनटॉनिकचा गूण आला आहे हें मला स्पष्ट कळून चुकलं आहे.

"तुमचीं हीं उडवाउडवीचीं उत्तरं आहेत. मला काय गूण आला आहे, सांगा पाहूं ?"

"माझ्या ब्रेन-टॉनिकचा तुम्हाला गुण आला नसतां तर तुम्ही माझ्याकडे तक्रारीला आलाच नसता. क्षणभर असं समजा कीं मी ब्रेन--टॉनिकच्या बाबतींत लबाडी केली आहे. ती लबाडी पूर्वी तुमच्या लक्षांत आली नाहीं आणि अलीकडेच आली आहे. तर मग तो माझ्या ब्रेन–टॉनिकचाच परिणाम आहे. म्हणजे तुम्हाला गूण आला आहे. आणि समजा मी

लबाडी केलेली नाहीं, तर मग पैसे परत मागण्याची जरूरच राहात नाहीं. "

" खरंच कीं ! हें नव्हतं बुवा आपल्या लक्षांत आलं. बरं, आतां असं करा या मोकळ्या बरण्या घ्या ठेऊन आणि दुसऱ्या दोन द्या. आतां मार्चे मधला एक चान्स घेऊन पाहूं. पण हें पहा, बिलांतून त्या मोकळ्या बरण्याची किंमत कमी करायला विसरूं नका हो. "

" हो ! हो ! तें काय सांगायला पाहिजे ? नेहमींचाच प्रघात आहे तो. " असें म्हणून स्वतःशींच मिस्किलपणें हंसत बजाबा आपल्या दुकानच्या पायऱ्या चढूं लागले.

त्या हंसण्याचा अर्थ काय बरें असावा ?



# कॉलेजयुवकांचें लघुकथालेखन : :- १९

मला वाटतें तात्यासाहेब केळकरांनींच कुठे तरी म्हटलेलें आहे, कीं "कॉलेजांतला प्रत्येक विद्यार्थी केव्हां ना केव्हां-तरी थोडाबहुत कवि झालेला असतो." त्यांच्या काळांतील विद्यार्थ्यांना कवितेची भूल पडत होती, आतां काळ बदललेला आहे, म्हणून कॉलेजांतील युवकांना भूल पडायची थांबली आहे असें मात्र नाहीं ! फक्त कवितेच्या ऐवजीं सध्या त्यांना लघुकथेची भूल पडत आहे ! गेल्या पिढींत 'ती' कविता कॉलेज—युवकांना भूल पाडीत होती, आजच्या पिढींत 'ती' लघुकथा त्यांना भूल पाडीत आहे. पुढच्या पिढींत 'ती'— हो ! पण त्याचा विचार आतांच कशाला ?—

हे विचार सुचायला एक कारण झालें. थोड्या दिवसांपूर्वी महाराष्ट्रांतील एका प्रसिद्ध कॉलेजांतलि 'वाङ्मय-विहार-मंडळा'तर्फे घडून आलेल्या लघुकथा—चढाओढींत परीक्षक या नात्यानें भाग घेण्याची मला संधि मिळालेली

होती. मंडळाच्या सदस्यांची संख्या सुमारें दोनशें होती आणि प्रत्यक्ष चढाओढींत एकोणीस विद्यार्थ्यांनीं भाग घेतलेला होता. या एकोणीस विद्यार्थ्यांत 'कला' आणि 'शास्त्र' या दोन्ही विभागाचे सर्व वर्गांतील विद्यार्थी होते. म्हणजे वाङ्मयाची आवड असलेल्या दर दहाजणांत एखादा तरी लघुकथा लिहिण्याचा प्रयत्न करतो हें उघड झालें. या वस्तुस्थितीवरून आपल्यास काय दिसून आलें? आजच्या कॉलेज—युवकांवर लघुकथेची भूल पुष्कळच पडलेली आहे असें नाहीं का आपल्याला वाटत?

चढाओढींत भाग घेणाऱ्या उमेदवारांची संख्या मोठी दिसली, तरी कथांची उभारणी ज्या विषयांवर झालेली आहे असे विषय मात्र संख्येनें अगदींच कमी होते. कथाविषयाच्या दृष्टीनें या एकोणीस कथांचें वर्गीकरण केलें तेव्हां असें दिसून आलें, कीं या एकोणीस कथांपैकीं सात कथा 'प्रेम' या विषयाला वाहिलेल्या आहेत. [ या सातांपैकीं पांच कथांत प्रेमभंग आहे ! ] दुसऱ्या सात कथांतून समाजांतील निरनिराळ्या विषमतेची भीषणता दाखविलेली आहे. दोन कथा विवाहपूर्व मातृपदाची तरफदारी करण्यासाठीं लिहिलेल्या आहेत. दोन कथा 'विनोद' विषयाला दिलेल्या आहेत आणि अवघी एक कथा 'कौटुंबिक वातावरण' निर्माण करण्यासाठीं लिहिलेली आहे.

या वर्गीकरणावरून अगदीं सिद्धांत नसला तरी असा

ठोकताळा काढायला कांहींच हरकत नाहीं, कीं आजच्या कॉलेज–युवकांच्या आवडीचे मुख्य विषय दोन आहेत—प्रेम आणि सामाजिक विषमता. आमच्या कॉलेजयुवकांवर प्रणयाची मोहिनी पडते, आमचे तरुण सामाजिक विषमतेविरुद्ध चवताळून उठतात, मग तारुण्यसुलभ ज्या इतर गोष्टी– देशभक्ति, स्वातंत्र्यप्रियता, धाडसी कृत्यांची आवड, त्यागाची आवड–त्यांची मोहिनी आमच्यावर कां बरें पडत नाहीं ? देशभक्ति, स्वातंत्र्यप्रियता, धाडसीं कृत्यें, उज्वल ऐतिहासिक प्रसंग इत्यादि विषयांवर लिहिली गेलेली एकहि कथा पुढें आली नव्हती हें खास.

सामाजिक विषमतेवर सात कथांची उभारणी झालेली आहे हें वर सांगितलेंच. पण कोणत्या सामाजिक विषमता आमच्या तरुणांच्या कल्पनाचक्षूंपुढें प्रामुख्यानें उभ्या राहतात हें पाहणें हेंहि कांहीं कमी मनोरंजक नाहीं. या सात कथांपैकीं दोन कथा 'गरिबी आणि श्रीमंती' या विषमतेवर लिहिलेल्या आहेत. दुसऱ्या दोन कथा 'कौटुंबिक विषमते' वर आधारलेल्या आहेत. आणखी दोन कथा वेश्येच्या मुलीसंबंधीं समाज जी विषमता दाखवतो तीवर कोरडे ओढण्यासाठीं अवतरल्या आहेत आणि एका कथेचा विषय 'धार्मिक विषमता' हा आहे. अर्थात् या विषमता लेखकांनीं आपल्या कल्पना चक्षूंनीं पाहिलेल्या आहेत. त्या विषमता त्यांच्या अंतःकरणाला भिडलेल्या आहेत कीं नाहींत याची शंकाच आहे. यामुळें या कथांतून व्हावा तितका जिव्हाळा निर्माण झालेला नाहीं.

कथांचीं कांहीं कांहीं शीर्षकें खरोखरीच मोठी मार्मिक होतीं. कथांच्या शीर्षकांची तुलना नेहमीं माणसांच्या चेहऱ्यांशीं करतात. चेहऱ्यावरून माणसाच्या स्वभावाची आणि योग्यतेची पारख करतां येते, त्याप्रमाणें कथेच्या शीर्षकावरून कथेची बहुतांशीं पारख होऊं शकते. या दृष्टीनें पुढील शीर्षकें पहा—'श्री ग' (श्रीमंतीचा गर्व) 'पापापोटीं पुण्य', 'दगडाचा देव' 'साधू आणि स्त्रीसुख', 'ब्रम्हचारी दिगू'.

लघुकथेच्या तंत्राच्या दृष्टीनें या कथांकडे पाहतांना असें दिसून आलें, कीं अगदी निर्दोष अशा कथा एकदोनच होत्या. बाकीच्यांत तंत्रासंबंधीं फारसा ताळ पाळलेला नव्हता. लघुकथेचें तंत्र अगदीं थोडक्यांत असें सांगतां येईल, कीं कथा पहिल्याने 'लघु' असली पाहिजे, तींत पाल्हाळ बिलकुल उपयोगी नाहीं, आणि दुसरें म्हणजे ती 'कथा' असली पाहिजे, मनोरंजक असली पाहिजे, आकर्षक असली पाहिजे. साहित्याच्या प्रांतांत नव्यानेंच पदार्पण करणाऱ्या कॉलेज–युवकांकडून फाजील तंत्रशुद्धतेची अपेक्षा करणें चुकीचेंच ठरेल; पण तंत्राच्या दृष्टीनें आमच्या तरुण मंडळींना पुष्कळच शिकावयाचें आहे असें म्हणणें गैरवाजवी होणार नाहीं.

प्रस्तुत चढाओढीचा विशेष हा होता, कीं सगळ्या कथा श्रोतृसमुदायापुढें वाचून दाखवायच्या होत्या. आतां प्रत्येक कथालेखक चांगला वाचक असेलच असें नसल्यामुळें जरूर असल्यास एखाद्या वाचकाची मदत घेण्याचीहि मुभा

ठेवलेली होती. त्यामुळें वाईट वाचनाचा परिणाम जो कथेच्या चांगुलपणावर होणें शक्य होतें तो टळला. श्रोतृवर्ग सर्वस्वी कॉलेज–युवकांचाच होता. त्यामुळें कथालेखकांवरून जीं सामान्य अनुमानें काढलीं त्याचा पडताळा श्रोतृवर्गावरून पाहण्यास चांगली संधि मिळाली. सर्व कथा वाचण्यास सुमारे तीन तास लागले. सर्व कथा एकाच बैठकींत वाचून घेतल्या नाहींत. दोन बैठकींत कथा वाचून घेतल्या. एक कथा वाचण्यास सरासरीनें दहा मिनटें लागलीं. अर्थात काहीं कथा दोनतीन मिनिटांतच वाचून झाल्या, तर कांहीं कथांना पंधरावीस मिनि-टेंहि पुरलीं नाहींत. कथा आकर्षक असली नी मग ती दीर्घ असली तरी श्रोत्यांची ऐकून घेण्याची तयारी असे; पण तीच जर का कंटाळवाणी असली, कीं हशा–टाळ्यांच्या खाचखळ-ग्यांतून कथेचा शेवट गाठेपर्यंत बिचाऱ्या वाचकाची एकच घाई उडून जात असे. एकोणीस कथांपैकी कांहीं कथा विद्या-र्थिनींनीं लिहिलेल्या होत्या. विद्यार्थिनींनीं लिहिलेल्यांपैकीं बहु-तेक कथा त्यांनीं धाडलेल्या पुरुष वाचकांनींच वाचल्या.

एकोणिस कथांपैकीं फक्त एकच कथा कल्पित होती. बाकीच्या अठरा कथा वास्तववादी होत्या. या वस्तुस्थितीवरून कांहींच अनुमान काढतां येणार नाहीं का? लेखक जगाचे निरीक्षण करीत असतो आणि हें निरीक्षण करीत असतां कांहीं प्रमेयें बांधीत असतो. आणि हीं प्रमेयें बांधून झालीं, हीं सत्यें एकदां तयार झालीं, कीं त्यांवर कथानकाचा साज चढवून तीं परि-

णामकारक रीतीनें वाचकांपुढें ठेवीत असतो. या परिणामकारक रीती प्रामुख्यानें तीन आहेत– ( १ ) वास्तववादी रीत ( २ ) आदर्शवादी रीत. ( ३ ) अद्भुतवादी रीत. या तीन रीतींपैकीं फक्त पहिली रीत हीच आमची अतिशय आवडती आहे ! वास्तविक तरुण लेखकांना कांहीं फारसा दोष देतां येणार नाहीं. जें कथाङ्मय आज कित्त्यादाखल आमच्या पुढें आहे त्यांत तरी वास्तववादाशिवाय दुसरा कोणता 'वाद' प्रामुख्यानें दिसून येतो ? कोणताहि नाहीं. मग तरुण मंडळींच्या लिखाणांत तरी दुसरे 'वाद' एकाएकीं कसें उत्पन्न होणार ?

भाषेच्या दृष्टीनें केवळ समाधानकारकपणा नव्हे तर अभिमानास्पद स्थिती आहे. कांहीं अशुद्धें, भाषादूषणें वगैरे आढळलीं, पण तीं अपवादात्मक. एकंदरीनें भाषा शुद्ध होती. पण विशेष महत्वाची गोष्ट अशी, कीं बऱ्याचशा लेखकांनीं कांहीं विशिष्ट भाषाशैली संपादन केलेली होती म्हणजे असें कीं, त्यांच्या लिखाणांत सफाई तर होतीच पण शोभाहि होती. सफाई आणि शोभा हे गुण म्हणजे भाषाशैलीचे प्राणच नव्हेत कां ? दोन पिढ्यामागच्या सुशिक्षित तरुण मंडळींना मराठींत पत्र लिहावयाचें म्हणजेसुद्धां जड जात असें असें म्हणतात. त्या मानानें आजची स्थिती कितीतरी अभिमानास्पद आहे.

बहुतेक सर्व कथांच्या बाबतींत प्रामुख्यानें एक गोष्ट नजरेस आली. ती ही, कीं त्या कथांवर पडलेली थोर लेख-

कांच्या लिखाणाची छाया. प्रो. फडके, श्री. खांडेकर आणि श्री. य. गो. जोशी या कथालेखकांच्या लिखाणाची छाया बहुतेक सर्व कथांवर कमी अधिक प्रमाणांत पडलेली आढळली. या विधानानें त्या तरुण लेखकांकडे गौणत्व येतें असें वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. अनुकरण ही प्रगतीच्या मार्गांतील एक महत्वाची अवस्था आहे. त्या अवस्थेंतून लहानथोर सर्वच लेखकांना जावें लागतें. मात्र कांहीं लेखकांच्या बाबतींत ही अवस्था फार थोडा काळ टिकते, तर कांहींच्या बाबतींत ती जन्मभर पुरून उरते. नव्या लेखकांना फार तर एवढेंच सांगतां येईल, कीं अनुकरणाच्या अवस्थेंतून लौकर बाहेर पडण्याचा प्रयत्न करा. त्यांना अजिबात अनुकरण करूं नका असें सांगणें निखालस चुकीचें होईल. यदाकदाचित् वाईट वाटलेंच तर तें त्यांनीं अनुकरण केलें म्हणून नव्हे, तर फार थोड्या लेखकांचें केलें म्हणून! आपल्या सुदैवानें गेल्या दहावीस वर्षांत आपल्यांत कितीतरी थोरथोर साहित्यिक पैदा झालेले आहेत; पण त्यांची अल्पशी माहितीहि आमच्या तरुण मंडळींना नाहीं असें त्यांचें लिखाण सांगतें.

वर उल्लेखिलेल्या लेखकत्रयींचें अंधानुकरण आणि डोळस अनुकरण दोन्ही प्रकारचें अनुकरण झालेलें स्पष्ट दिसतें. अंधानुकरणाचीं उदाहरणें देण्याची जरूर नाहीं, कारण अंधानुकरण म्हणजे काय याची कल्पना सर्वांना असतेच. मी ‘ डोळस अनुकरण ’ कशाला म्हणतों याची वाचकांस कल्पना

येण्यासाठीं दोन लहानसे उतारे पुढे देऊन हा लेख आटोपता घेतों. अनुकरण कोणत्या लेखकांचें केलेलें आहे हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे.

१

" अजूनहि बरं नाहीं का वाटत ? अं ? असं काय बरं ? सांगना. " तो म्हणाला.

मी उठून बसलें. माझे हात त्याच्या गळ्याभोंवतीं होते अन् माझे डोळे त्याच्या प्रेमळ नजरेशीं भिडले होते.

" बरं वाटल्याखेरीज राहील का रामबाण औषध मिळाल्यावर ? " हळूच बोललें मी.

" कां ? असं कोणतं रामबाण औषध मिळालं ? अन् असा धन्वंतरी तरी कोण ? " मघाशीं प्रेमाश्रूंनीं चमकणारे त्याचे डोळे आतां मिस्किलपणें हंसत होते.

" दुसरं कोण असणार बरं ?" मीं म्हटलें.

" हो का ? मग डॉक्टरची फी नी बिल ? "

" मोफत औषध आहे हें." मलाहि हसूं आलें.

" मोफत औषध गरिबासाठी ! लबाड लोकांच्याकडून मात्र दुप्पट फी वसूल करायची असते !"

— अन् पुढं मला त्यानं बोलूंच दिलं नाहीं !

२

" तो साधु आणि ती तरुण स्त्री चालू लागलीं. घनदाट पर्णराजीमध्यें वावरणाऱ्या त्या मानवप्राण्यांना पाहून वृक्ष कसे

जागच्याजागीं थबकून उभे होते. आणि त्यांना न्याहाळण्या-साठींच कीं काय कुणास ठाऊक, तरूंच्या शेंड्यावरून आणि हिरव्यागार पल्लवांमधून सूर्याचे सोनेरी किरण स्पर्धेनें आंत घुसत होते. त्यामुळें कधींकधीं त्याचे कवडसे त्या स्त्रीच्या मुखा-वर व वस्त्रावर पडत असत. ते किती मनोहर वाटत होतें ! चालतांना ती तरुणी बरीच उल्हसित दिसत होती अन् तिच्या हालचालींत एक प्रकारचें चांचल्य आलें होते. ती आपला पदर उगीचच सारखा करी, केसांवरून हात फिरवी, गळ्यांतील माळ नीटनेटकी करी आणि मनगटावरच्या काचेच्या बांगड्या वरखालीं फिरवी. उलट, साधु धीरगंभीर पावलें टाकीत होता...."



# उपहारगृहांतील कोलफट !

## : : -२०

स्टेशनसमोरील एक प्रशस्त उपहारगृह. वेळ पहांटेचे साडेपांच वाजण्याची. स्टेशनवर गाडी नुकतीच आलेली असल्यामुळें स्टेशनच्या दरवाजांतून उतारूंची गर्दी बाहेर येत आहे आणि त्यांच्यापैकीं बहुतेकांची चहाची वेळ झाली असल्यामुळें ते उपहारगृहाकडे आकर्षिले जात आहेत.

उपहारगृहाच्या दारांतच मॅनेजरसाहेबांचें ऑफिस थाटलेलें आहे. नित्याप्रमाणें त्यांनीं आपली खुर्ची सुशोभित केलेली आहे. त्यांच्यापुढें असलेल्या टेबलावर कांहीं चिल्लर, पावाचे तुकडे, फोडलेली सुपारी, विड्या व सिगारेट्स, काड्याच्या पेट्या, चारपांच बरण्या, यांची गर्दी झालेली आहे. जणुकांहीं उपहारगृहांत किती विविध प्रकारच्या लोकांची गर्दी होते याचें तें टेबल म्हणजे एक प्रतीकच आहे.

मॅनेजरसाहेब काल रात्रीं सिनेमाला जाऊन आले असल्यानें त्यांच्या डोळ्यावरील झोंपेची झांपड अद्याप उडालेली

नाहीं, आणि एकाद्या गोड पदाचा चरण कळत न कळत गुणगुणला जातो त्याप्रमाणें कळत न कळत ते डुलक्या घेत आहेत. पण त्यांच्या या सविकल्प समाधींत गिऱ्हाइकांनीं एक-सारखा व्यत्यय आणण्याचा जणुं कटच केलेला असल्यामुळें पुरेशी झोंप न मिळाल्यानें त्यांचे तारवटलेले डोळे अधिकच लाल दिसत आहेत.

तोंच एक गिऱ्हाईक आपला फराळ आटोपून पैसे चुकते करण्यासाठीं त्यांच्या टेबलापाशीं येतें. पोऱ्या मागून ओरडतो—

" एक इसम— सव्वा आणा — "

" काय सव्वा आणा ? फक्त एक कप चहा घेतला आणि सव्वा आणा ? " आश्चर्यानें थक्क झालेलें गिऱ्हाईक तोंड वेडेंवांकडें करीत विचारतें.

" कायरे तुक्या, यांचा सव्वा आणा झालाय् ना ? हे म्हणतात कीं पाऊण आणा झालाय म्हणून ! "

मॅनेजर साहेबांचे उच्च स्वरांतले हे शब्द ऐकताच खाद्यपेयांवर ताव मारणाऱ्या इतर गिऱ्हाइकाचेंहि लक्ष त्या दोघांकडे वळतें.

तुक्याः-(कोपऱ्यांतून) काय म्हणतात ? पाऊण आणा ? एक चहा आणि एक चिवडा. सव्वा आणा !

मॅनेजरः-ऐकलत ? एक चहा आणि एक चिवडा सव्वा आण्णा.

गिऱ्हाईकः-पण मी चिवडा घेतला नाहीं.

तुक्या:–( कामांत गुंतलों आहोंत असें बाहेरून दाखवीत पण सारें लक्ष मॅनेजर व गिऱ्हाईक यांच्या बोलण्याकडे ठेवीत ) ही बगा मोकळी प्लेट, आजून हातांत हाय.

गिऱ्हाईक:–माझी नव्हे ती प्लेट. दुसऱ्या कुणाची तरी असेल. ( मॅनेजर आंबट चेहरा करून कांहींसें बोलणार तोंच )—

दुसरें एक गिऱ्हाईक:–ती मोकळी प्लेट माझी आहे.

पहिलें गिऱ्हाईक मॅनेजरसाहेबाकडे विजयमुद्रेनें पाहतें.

मॅनेजर थप्पड खाल्यासारखा चेहरा करून पाऊण आणा घेतात. गिऱ्हाईक बाहेर जातें. क्रुद्ध मॅनेजरसाहेबांना हा अपमान बिलकूल सहन होत नाहीं. ते तावातावानें आपल्या जागेवरून उठतात. आणि ' भक्त प्रल्हाद ' मधील 'प्रल्हाद' 'प्रल्हाद' म्हणून ओरडणाऱ्या हिरण्यकश्यपूप्रमाणें ' तुक्या ' ' तुक्या ' म्हणून ओरडत बाक-टेबलांमधून हिंडूं लागतात.

हिरण्यकश्यपूचा हा उग्रअवतार पाहून तुक्या केव्हांच अदृश्य झालेला असतो.

" तुक्या, गाढवा, कामें करतां कां झोंप घेतां ? हजारदा सांगितलं कीं सिनेमाला जात जाऊं नका म्हणून ! मग्रूर कुठले. नोकरी करावयाची नसली तर चालता हो. असलीं शंभर पोरं आणून ओळीनें उभी करीन आणि—"

मॅनेजरसाहेबांचें हें राणा भीमदेवी भाषण अजून संपायचेंच आहे. तोंच चहा तयार करावयाच्या खोलीवजा

जागेंतून एक कफ खळकन् खालीं पडून फुटल्याचा आवाज कानीं येतो. पानिपतच्या लढाईत गिलच्यांनीं भाऊसाहेबांवर हल्ला करतांच जनकोजीबाबा ज्या त्वेषानें भाऊसाहेबांकडे गेले त्या त्वेषानें मॅनेजरसाहेब त्या जागेकडे धांवतात.

क्षणार्धांत त्यांच्या लक्षांत येतें—रात्रीं सिनेमाचं जाग्रण झाल्यामुळें झोंपेच्या गुंगींत राम्याच्या हातून कप पडून फुटला !—

त्यांच्या तोंडची बहुतेक वाफ तुक्याप्रकरणीं खर्च झाली असल्यानें राम्या--प्रकरणांत ते हाताचा उपयोग करूं लागतात. गिऱ्हाईकांना फुकट सिनेमा पहायला मिळतो व तीं खदखदां हसूं लागतात.

अफझुलवधानंतर प्रतापगडावर येणाऱ्या शिवछत्रपतीच्या आनंदानें मॅनेजरसाहेब राम्याचें व तुक्याचें पारिपत्य करून स्वस्थानीं परत येतात.

वळवाच्या पावसानंतर सूर्य हळूंच ढगांमागून बाहेर येतो त्याप्रमाणें तुक्या हळूंच प्रगट होतो व आपल्या चहा देण्याच्या कामाला लागतो.

त्याचें चापल्य व धोरण पाहून जमलेलीं गिऱ्हाइकें केवळ नजरेनें त्याचें मुकें अभिनंदन करूं लागतात. तोही त्यांच्याकडे पाहून मिस्किलपणानें हंसूं लागतो.

पण दुसऱ्या क्षणीं वातावरण बिघडतें.

तुक्यानें दिलेल्या नव्या चहाचा पहिला घोट गिऱ्हा-

इकांच्या गळीं उतरतो न उतरतो तोंच जिकडून तिकडून गिल्ला होतोः—" असला कसला हो चहा ?" " मॅनेजर-साहेब हा चहा आहे की सोंग आहे ?" " मॅनेजरसाहेब, चहाचीच पावडर वापरतां कीं कडू लिंबाची ?"—

त्या चहाच्या एकाच घोटानें मॅनेजरसाहेबांच्या लक्षांत सारा प्रकार येतो—आंबट दूध ! मार बसल्यामुळें राम्यानें रागाच्या भरांत नासलेलें दूध चहांत घातलें !....

हश्य—हुश्य करीत नुक्तेच स्थानापन्न झालेले मॅनेजर साहेब या नव्या घडामोडीनें एकदम बेफाम होतात. शिवाजी-महाराजांच्या मरणानंतर दक्खनच्या दुनियेवर कायमचा चांद लावण्याच्या इराद्यानें दक्षिणेंत आलेल्या औरंगजेबानें मराठ्यांचे किल्ले घ्यावेत व पुढें जावें तोंच ते किल्ले मराठ्यांनीं परत जिंकावेत असा प्रकार चालला असतां औरंगजेबाच्या मनःस्थितीची अशीच अवस्था झाली नव्हती कां ? बारा हात उडी मारून उदयभानूवर त्वेषानें हल्ला करणाऱ्या शेलारमामाप्रमाणें मॅनेजर साहेब तुक्याच्या अंगावर धांवतात.

त्याचक्षणीं चाणाक्ष गिऱ्हाइकांच्या लक्षांत येतें कीं, खाल्लेल्या जिनसांचें बिल न देतां पसार होण्याला हीच नामी संधी आहे. नाहींतरी ' इंग्लंडवरचें संकट म्हणजे आयर्लंडची सुवर्ण--संधी ' हा सुवर्ण नियम आयरिश देशभक्तांनीं शोधून काढलाच होता !—

दोन्ही हातांनीं तुक्याच्या समाचार घेणें चाललें असतां

मॅनेजरसाहेबांचें लक्ष सहज द्वाराकडे जातें तों एकेक गिऱ्हाईक बिल न भागवितां तसेंच बाहेर चाललें आहे ! मॅनेजर–साहेब मोठमोठ्यानें ओरडतात " अहो पैसे ! पैसे ! !...." ....पण त्यांची हांक ऐकायला गिऱ्हाइकांना थोडीच सवड आहे !—

त्रिचनापल्लीवर हल्ला करणाऱ्या चंदासाहेबाच्या अर्काट राजधानीवर क्लाइव्हनें स्वारी केली असतां चंदासाहेबांच्या मनाची जशी अवस्था झाली तशीच यावेळीं मॅनेजरसाहेबांच्या मनाची अवस्था होते व त्रिचनापल्लीचा वेढा उठविणाऱ्या चंदासाहेबाप्रमाणें मॅनेजरसाहेब तुक्यावरचा आपला हात आवरता घेतात.

आणि मॅनेजरसाहेबांची पाठ फिरतांच तुक्या तेथून निसटतो व क्षणार्धांत अदृश्य होतो.

मॅनेजरसाहेब आपल्या जागेकडे परततात. पण यावेळीं त्यांचा चेहरा रशियावरची अपेशी स्वारी संपवून पॅरिसकडे परत येणाऱ्या बोनापार्टच्या चेहऱ्याप्रमाणें झालेला दिसतो.

मॅनेजरसाहेब परत स्थानापन्न होतात व एक दीर्घ निःश्वास सोडून एवढेच उद्‌गार काढतात—

" सिनेमा ! सिनेमा भोंवतों आहे बरं हा ! ! इंग्रजांनीं कशाला ही ब्याद आमच्या देशांत येऊं दिली देव जाणे ! "

तोंच एक नवें गिऱ्हाइक ऑर्डर देतें—

" दोन कप चहा ऽऽ "

मॅनेजरसाहेबांच्या तोंडावर क्षणिक हंसूं चमकतें.

— पण त्या इंग्रज सरकारनें चहा येऊं दिला ! चहा आला म्हणून हॉटेलें आलीं. हॉटेलें आलीं म्हणून गिऱ्हाईकें आलीं........

त्यांच्या तोंडावर जें क्षणिक हंसूं चमकतें त्याला त्यांच्या लक्षांत आलेला हा विरोध तर कारणीभूत नसेल ?



गुन्हेगार :—२१

## एका गुन्हेगार मनाचें शब्दचित्र.

रोजच्या सकाळसारखीच ती सकाळ. पण तिच्यांत रोजची प्रसन्नता नसून भयानकता आहे असें माझ्या गुन्हेगार मनाला वाटे.

माझ्या नजेरसमोर पूर्व क्षितिजावर उगवणारें सूर्यबिंब रोजच्याहून आज मला फारच उग्र दिसलें. काल संध्याकाळीं केलेल्या गुन्ह्यामुळें रात्रभर माझ्या डोळ्याला डोळा लागला नाहीं. त्यामुळें आज सकाळीं जी उग्रता माझ्या डोळ्यांत आणि शरिरावर आली होती तिचेंच प्रगट स्वरूप त्या उगवत्या सूर्यबिंबांत दिसत नव्हतें ना ?

चोरीच्या नोटा आंतल्या खिशांत ठेवून मी व माझा साथीदार दगडू पहाटेचेच शहराबाहेर पडलों आणि शहर सोडून चारपांच मैल आल्यावर सूर्योदय झाला.

त्यानंतर आम्हांला आडवाटेनें जायचें होतें. आमचा रस्ता नदीकडेनें जात होता आणि अशा रीतीनें बरेंच अंतर ओलांडून गेल्यावर आम्हांला नदीपार व्हायचे होतें.

कित्येक ठिकाणीं आम्हांला दरडीवरून जावें लागे. माझ्या पायांखालची जमीन सुटून मी घरंगळत नदीच्या पात्रांत पडून वहावत जाऊन मरणार तर नाहींना असें मला वाटे. आणि तसें झाल्यास आमच्या चोरीचा मला काय उपयोग, अशीही शंका मनांत येई.

नदी दुथडीं भरून चालली होती आणि ज्या ठिकाणीं आम्हाला नदीपार व्हावयाचें होतें त्या ठिकाणीं आम्हांला उतार मिळणार नाहीं हें स्पष्ट दिसत होतें. मी दगडूला तसें म्हणालोंही. त्यावर तो कांहीं न बोलतां चालूं लागला. मी त्याच्या मागून चालूं लागलों. मला स्वतःची इच्छाशक्तिच उरली नव्हती. कालच्या गुन्ह्यांत माझी सर्व इच्छाशक्ति खर्चुन तर गेली नाहीं ना, अशी मला शंका आली.

एका शेतांतील सड आणि केरकचरा गोळा करून शेत-कऱ्यांनीं पेटवून दिला होता. त्याच्या धुरानें वातावरण भरून गेलें होतें. आम्ही त्यांत सांपडलों. आमचा कोंडमारा होत होता. पण त्याच वेळीं आम्ही लोकांच्या दृष्टीपासून अलिप्त राहिलों होतों. लोकांची नजर चुकवून आम्हांला जन्म-भर असेच राहतां येईल तर आम्ही खरेखुरे नशिबवान असें मला वाटे. पण गुन्हेगारांचें नशिब इतकें शिकंदर कुठून अस-णार, असाही विचार मनांत आला.

आमच्या वाटेलगतच असलेल्या एका चंद्रमौळी खोप-टाबाहेर एक म्हातारा मुसलमान शेतकरी बसला होता. त्यानें

जी एक फाटकी वाकळ अंगावरून घेतली होती तीमुळें त्याचें अर्धनग्न शरीर झांकून न जातां आमच्या दृष्टिपथांत येत होतें. डोक्याला त्यानें जी तांबडी चिंधी गुंडाळली होती तीमुळें डोकें झांकलें न जातां त्याच्या वाढलेल्या हजामतीखालीं ती चिंधीच कित्येक ठिकाणीं झांकली गेली होती.

"नदीला उतार आहे काय?" मी त्याला विचारलें.

"हाय. हाय. बेशक जावा तुमी." उत्तर देतांना वेडावतात तसें तो हसला आणि बोलतांना त्याच्या दांतांपैकीं जो एकच दांत शिल्लक राहिला होता तो जिभेच्या स्पर्शानें हालला तेंही मला किळसवाणें वाटलें.

पुढच्या एका शेतांत उगवलेल्या कापसाच्या पिकांत मेंढरें चरावयास सोडून देऊन चारपांच धनगर लोक एका पडक्या भिंतीच्या सावलींत बसले होते. त्यांच्यासमोर एक दांडगा कुत्रा अस्ताव्यस्त पडला होता आणि धाप लागल्यामुळें त्यानें जी जीभ बाहेर काढली होती तींतून लाळ गळत होती. आम्हांला पाहतांच ते धनगर आपापसांत बोलूं लागले. आम्हांला लुबाडण्याचा तर त्यांचा बेत नसेल?

ज्या दरींतून आमची वाट गेली होती तींत उतरण्यापूर्वी डोळे ताणून मी चहूंबाजूंस पाहिलें, पण मानव प्राण्याच्या अस्तित्वाची शंकाही येत नव्हती. लांबवर एक गाढव गवत कुरतडत होतें. त्याचीं हाडें इतक्या अंतरावरूनही मोजतां येण्यासारखीं होतीं. लोकांच्या दृष्टीपथापासून मी आलिप्त असावें

असें जरी वाटे तरी लोक माझ्या दृष्टिपथाबाहेर असूं नयेत अशीही माझ्या जिवाला ओढणी लागे. निर्जन रानांत माझें आधींचेंच भीतिग्रस्त मन हजारों शंकाकुशंकांनीं जास्तच भेदरून जाई.

आम्हीं दरींत उतरत असतां खालच्या बाजूनें एक घुबड उडून आलें तें थेट माझ्या डोक्यावरून पुढें गेलें. त्याचें तोंड पाहूं नये असें मला वाटे; पण माझ्या इच्छेला न जुमा-नतां माझे डोळे त्या घुबडाकडे लागले. त्यानेंही तोंड वळवून मागें पाहून आम्ही गुन्हेगार चाललों आहोंत अशीच जणूं आपली खात्री करून घेतली असावी.

दगडूच्या चालण्यांतला धीमेपणा मावळला. एक अभद्र शिवी हासडून त्यानें उद्गार काढले—

" अरेच्या, ह्यानं फिरून मागे वळून त्वांड दावलं कीं ! लक्षण काय बराबर दिसत न्हाई ! " माझ्याप्रमाणें दगडूचीही इच्छाशक्ति नष्ट होण्याच्या बेताला आली होती काय ? छे ! नाहींच. तो चालण्यांत चाचरला. पण किती वेळ ? चार दोन मिनिटें. त्यानंतर तो फिरून धीमेपणानें चालूं लागला.

आम्ही उताराच्या ठिकाणीं आलों तेव्हां एक म्हतारी परटीण नदीवर कपडे धूत होती. नदीला उतार आहे किंवा नाहीं अशा अर्थाचा प्रश्न जेव्हां दगडूनें तिला विचारला, तेव्हां एका विशिष्ट ठिकाणाकडे बोट दाखवून " तिकडनं तुम्ही आंत उतरा म्हणजे तिथं पाणी उथळ आहे, " असें

तिनें उत्तर दिलें. पण ज्या एका खुनशीं नजरेनें तिनें पाहिलें त्याचा अर्थ " तुम्ही चोर आहांत, बदमाश आहांत, त्या तिकडून चला आणि खोल पाण्यांत बुडून मरा " असाच असला पाहिजे.

दगडूनें धोतर नीट खोवलें, कपडे काढून डोकीवर बांधले आणि तो पाण्यांत उतरला. त्याच्या मागोमाग मीही उतरलों. आमच्यापुढें पाणी अगदीं संथ दिसत होतें. दगडू सावकाश पावलें टाकीत पाण्यांतून चालला होता आणि दर पावलास त्याचें अंग पाण्यांत जास्त जास्त बुडत चाललें होतें.

एकवार मागें माझ्याकडे नजर टाकून दगडूनें एकदोन पावलें पुढें टाकली असतील नसतील तोंच त्यानें एक भयंकर किंकाळी फोडिली आणि त्या संथ भासणाऱ्या पाण्यांत तो अकस्मात् दिसेनासा झाला. त्यानंतर त्या ठिकाणीं पाण्याची खळबळ सुरू झाली, आणि अनेक चक्राकार भोंवरे फिरूं लागले.

माझ्या पायाखालची जमीन दुभंगून जात आहेसें मला वाटलें. कसल्यातरी गुळगुळीत अंगाच्या प्राण्यावर माझा पाय पडला आणि तो प्राणी सळकन् माझ्या पायांखालून निसटून गेला तेव्हां तर मला कांपरेंच भरल्यासारखें झालें.

खालच्या बाजूस धूत असलेली परटीण आमच्या यातनांकडे पाहून खुनशीपणानें मनःपूर्वक हंसत होती.

" शेटजी मुंबईहून येण्याच्या आंत त्यांचे पैसे जागच्या

जागीं नेऊन ठेवलेच पाहिजेत.'' या विचारासरशीं मी झटकन् मागें वळलों आणि त्या म्हाताऱ्या परटिणीकडे एक तिरस्कार-युक्त नजर टाकून मी माझा मार्ग आक्रमूं लागलों.



# पाटलांची बैलजोडी : :– २२

पाटलांची बैलजोडी माहीत नाहीं असा मनुष्य आमच्या खेड्यांत तर नव्हताच पण भोंवतालच्या दहापांच खेड्यांतही बहुतेक नव्हता असें म्हटलें तरी चालेल. खिल्लार जातीची ही खोंडांची जोडी दोन वर्षांपूर्वी पाटलांनीं पाण्या–सारखा पैसा ओतून विकत घेतली आणि ती जोडी विकत घेतांच भिव्या रामोशी या नांवाचा एक स्वतंत्र गडी पाटलांनीं तिच्या तैनातीस जोडून दिला होता. पाटलांच्या मळींत ही जोडी बांधलेली असे. ऐन उन्हाळ्यांत या खोंडांना हिरव्याची कमतरता पडूं नये अशी पाटलांनीं तजवीज केली होती. खाण्यास मुबलक आणि कामाचा अभाव अशी स्थिति असल्या-वर पाटलांच्या बैलांच्या पाठीवर पन्हळ पडावी यांत कांहींच नवल नव्हतें.

मुद्दाम तयार करविलेल्या गाडीला जुंपल्यावर गळ्यांतले रुम्झुम् चाळ वाजवीत पाटलांची बैलगाडी गांवांतून चालली कीं माणूस चालायचा थबकून त्या गाडीकडे पहात उभा राही आणि अशा वेळीं गाडींत बसलेल्या पाटलांचा विशाल

ऊर आनंदानें भरून येई. बेंदरासारख्या सणासुदीच्या दिवशीं रेशमी झुलीचा डौलदार साज बैलांच्या पाठीवर चढवून पाटील बैलांची मिरवणूक काढीत आणि सभोंवार जमलेल्या भाबड्या शेतकऱ्यांनीं "बैल असावेत तर असे असावेत" असे काढलेले उद्गार त्यांच्या आतुर कानांवर आले कीं पाटलांना देहभान विसरल्यासारखें होई.

पण पाटलांच्या बैलजोडीचा लौकिक–किंवा अधिक स्पष्ट व खरें बोलायचें तर दुर्लौकिक—पसरला होता त्याला एवढेंच कारण नव्हतें. याहून अगदीं निराळें आणि अधिक महत्वाचें असें एक कारण होतें. भिव्याची नेमणूक पाटलांनीं बुद्धिपुरस्सर केली होती. सुगीच्या दिवसांत रात्रीच्या वेळीं शेतकरी घराकडे परतले म्हणजे त्यांच्या माघारीं आपले खोंड त्यांच्या पिकांत घालण्याबद्दल पाटलांची भिव्याला शिकवण असे. आणि ही कामगिरी करील असा लायख मनुष्य निदान पाटलांच्या पाहण्यांत तरी संबंध गावांत भिव्याशिवाय दुसरा कुणीच नव्हता. उभीं पिकें जनावरांना चारीत असलेल्या भिव्याला कुशाबा जाधव आणि दुसऱ्या कांहीं शेतकऱ्यांनीं एकदोनदां पकडलाही होता. पण त्याचा काय उपयोग ? जनावरें पाटलांचींच असल्यानें कोंडवाड्यांत घालण्याची सोयच नव्हती आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे तक्रार न्यावी तर दंश धरून पाटील केव्हां काय करतील याचा नियम नव्हता ! पावसानें झोडपल्यावर दाद कुणाजवळ मागायची ?

याच्याच जोडीला आणखी एक कारण होतें. कुणाच्या शेतांत काय पिकलें आहे याचा पाटील बारकाईनें तपास काढीत आणि ऐन सुगीच्या वेळीं आपला शिपाई धाडून कांहीं पीक सक्तीच्या खुषीनें ते आपल्या जनावरांकरितां आणवून घेत. गाजरे पिकविणाऱ्या शिदु माळ्याला, मका पिकविणाऱ्या गणू कोळ्याला, शेतांत हमेश शाळु करणाऱ्या दौलती चांभाराला, जवळ जवळ प्रत्येक शेतकऱ्याला पाटलांच्या बैलांचा करभार अगोदर निराळा काढून ठेवावा लागे. इसापच्या 'बेडूक आणि मुलें' या गोष्टींतल्या मुलांचा खेळ जसा बेडकांच्या संकटांना कारणीभूत झाला, त्याप्रमाणें पाटलांचा बैलांचा शोक गांवच्या गरीब रयतेला त्रासदायक झाला होता.

आपल्या देखण्या जनावरांचें प्रदर्शन करण्याचा कुठलाही प्रसंग पाटील फुकट दवडीत नसत. वास्तविक गांवापासून सात मैल दूर असलेल्या शहरांत भरणाऱ्या दर रविवारच्या बाजारांत पाटलांना काय खरेदी असते ? पण बाजाराला गेल्यानें आपल्या बैलजोडीचें प्रदर्शन होतें, हा एक मोठा फायदा असल्यानें पाटील एकही बाजार चुकवीत नसत. बाजारला आलेल्या खेड्यापाड्यांतल्या लोकांनीं आपल्या बैलजोडीकडे पहात रहावें, अमुक अमुक गांवच्या पाटलाची ही बैलजोडी असें ह्मणावें, त्यांनीं आपापल्या गांवांतल्या उत्तम बैलजोडीची आपल्या बैलजोडीशीं तुलना करावी, असें पाटलांना फार फार वाटे. त्यांच्या बैलजोडीचा लौकिक गांवगन्ना होण्यास

हें एक महत्वाचें कारण होतें.

ते सुगीचे सरते दिवस होते. बहुतेक शेतांतून मळण्या झाल्या होत्या. कुशाबा जाधवाची मळणी नुक्तीच आटोपली होती आणि धान्य वाढवून पोत्यांतून भरून दुसऱ्या दिवशीं माल बाजारांत नेण्याच्या तयारीस तो लागला होता. त्याच्या बांधास लागूनच पाटलांची मळी होती. आपल्या बसल्या जागेवरून भिव्या रामोशी जाधवांची सर्व हालचाल न्याहाळीत होता आणि पोत्यांची तोंडें शिवून तयार होतांच भिमराव रामोशी हातांतला सोडगा लीलेने अंगाभोंवतीं फिरवीत जाधवांच्या खळ्यावर आले.

" काय कुशाबा, बाजारला जाण्याची तयारी झाली जणुं"? भिव्यानें विचारलें. वास्तविक कुशाबा जाधवांना नांवानें हांक मारण्याची भिव्याची लायखी नव्हती; पण थोराघरचें श्वान रस्त्यानें उगीचच गुरगुरत जातें त्याप्रमाणें नेहमीं आपल्या ह्याच्यांतच असायचें आणि दुसऱ्यांना कमीं लेखायचें हें भिव्याच्या अंगवळणीं पडून गेलें होतें.

जाधवांनीं तें मनांवर घेतलें नाहीं. आणि त्याच्या प्रश्नास कांहींतरी उत्तर द्यायचे म्हणून ते म्हणाले, " होय."

" मग आमची वांटणी टाका कीं." भिव्यानें मिस्किलपणें हंसत विचारलें.

" तुमची वांटणी ? तुमची वांटणी कसली ? "

" आमची म्हणजे आमच्या बैलांची. "

" तुझे बैल ज्वारी केव्हांपासून खाऊं लागले ? "

" बैल नसले तरी बैलांचा राखणदार खातो ना ! "

" मग तुला स्वतःला जोंधळे पाहिजेत असंच का सरळ म्हणेनास ? "

" तसं म्हटलं तरी चालेल. "

" किती घ्यायचे ? "

" फार कांहीं नाहीं. एक मणभर. "

" तुझ्या बापानं ठेवले आहेत इथं ! मुकाट्यानं जातोस का देऊं गचांडी ? "

" कुशाबा, हें बरं नव्हे. पाटलांच्या कानांवर ही वर्दी जाईल बरं ! "

"तुझ्या पाटलांनं तुला खळ्यावर जाऊन ज्वारी मागायला सांगितलं नाहीं समजलास. जास्त बोलूं नको; अगोदर इथून पाय काढ "

" असं का ! समजेल तुम्हाला काय तें लौकरच "—

दांतओंठ खात भिव्या खळ्यावरून परत फिरला. पाटलांच्या चाकरीत राहिल्यापासून त्याला नामोहरम होण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. थोरामोठ्याच्या आसऱ्याचा त्याच्यावर कैफ चढला होता आणि तो कैफ उतरविणारे हें जालिम औषध मिळतांच भिव्याच्या अंगाची लाही झाली.

दुसऱ्या दिवशीं उजडण्यापूर्वीच भिव्या पाटलांच्या वाड्यांत आला. अशा चमत्कारिक वेळीं तो आलेला कळतांच

पाटलांना आश्चर्य वाटलें. आणि थोड्या लगबगीनें पाटील सदरेवर आले.

" सरकार—"

काय हकीगत आहे भिवा ? "

" सरकार, काल रात्रीं मी आमच्या बांधावर आमचे बैल चारवीत असतां कुशाबा जाधवानं मला बेदम मारलं. रातचा वक्त असल्यानं मी काल आलों नाहीं सरकार. "

" तुला मारलं ? आणि तूं काय हातांत बांगड्या भरल्या होत्यास काय ? रामोशाची जात सांगतोस ना ? "

" बांगड्या नाहीं सरकार. मी सुद्धां ठोशाला ठोसा ठेवून दिला सरकार. पण मीं पडलों एकटा आणि ते पडले चौघेजण. कुशाबा आणि त्याची तीन पोरं."

" असं का ? ठीक आहे. पाहून घेईन. काल रात्रीं हें झालं म्हणतोस, नाहीं का ? त्याच्या शेतांत कीं आमच्या शेतांत, कुठं झाली रे ही मारामारी ? "

" शेतांत कुठली सरकार ! बांधावर. "

" ठीक आहे. जा आतां तूं. "

एवढें मात्र खरें कीं पाटलांनीं त्या दिवशीं किंवा पुढें केव्हांही कुशाबाला किंवा त्याच्या मुलांना चावडीवर मुळींच बोलावून आणलें नाहीं. कदाचित् त्यांना भिव्याच्या हकीग— गतीच्या सच्चेपणाबद्दल शंका आली असेल. कदाचित् भिव्या आपले बैल घेऊन कुशाबाच्या शेतांत रात्रीं शिरल्या-

बरोबर दबा धरून बसलेल्या कुशाबानें आणि त्याच्या मुलांनीं त्याला 'बदडला असेल असाही तर्क पाटलांच्या मनांत आला असेल—

तें कांहींही असो– उघड चौकशी करण्याचा प्रयत्न मात्र पाटलांनीं केव्हांही केला नाहीं हें खरें. मात्र भिव्याच्या बाबतींत घडलेला हा अत्याचार आणि पर्यायानें त्यांचा स्वत:चा अपमान ते मनांतल्या मनांत बाळगून होते.

तो रविवारचा दिवस होता कुशाबा जाधवांनीं पहां- टेच्याच गाड्या लादल्या आणि ते शहराकडे चालले. दिवस उगवल्यावर पाटलांनीं आपली गाडी सज्ज केली. मागच्या बाजारीं खरेदी केलेला रंगीत चाबूक त्यांनीं हातीं घेतला आणि गांवच्या प्रमुख रस्त्यानें गाडी उडवीत ते गांवाबाहेर पडले.

त्या दिवशींच्या संध्याकाळची हकीगत. बाजारचा गांव सोडून दोन मैलावर एक नदी आहे आणि आमच्या गांवीं यायचें तर ही नदी ओलांडून यावें लागतें. बाजारास गेलेल्या शेतकऱ्यांचा साधारणत: असा क्रम असे कीं, बाजार करून झाल्यावर संध्याकाळच्या सुमारास ते शहर सोडीत आणि नदीवर येत. नदीच्या शहराकडच्या तटावर एक लहानसें चहाचें दुकान असें. त्या दुकानचा चहा आमच्या गांवच्या शेतकऱ्यांना भारी प्रिय असे. बाजारच्या गांवीं चहाचीं इतकीं दुकानें असतांना कुणीहि तिथें चहा घेत

नसत, तर परत येतांना या दुकानीं घेत असत. चहा घेण्याकरितां गाडी थांबवायची, चहा घ्यायचा, विडा किंवा तंबाखू ओढायची आणि जमलें तर गप्पा छाटीत बसायचें. या अवधींत बाजारास गेलेले बहुतेक गांवकरी तिथें जमत आणि सर्वजण नदी ओलांडून हळूंहळूं गांवीं येत.

पाटील केव्हांचेच त्या दुकानीं दाखल झाले होते. दर रविवारचा बाजार न चुकवणाऱ्या पाटलांचा चांगलाच परिचय असल्यानें हॉटेलवाल्यानें त्यांच्याकरितां निराळी उच्च जागा आणि पेलाबशीच्या एका स्वतंत्र जोडीची व्यवस्था करून ठेवली होती. पाटील चहा घेत होते तरी त्यांचे कान मात्र शहरच्या रस्त्याकडे होते. बाजारास गावांतून कोण निघाले हें कळायला मार्ग नसे, पण इथें मात्र सर्वांच्याच गांठी पडायच्या. " अजून आपल्या गांवचा कुणीच कसा येत नाहीं बुवा ! " पाटील मनाशीं आश्चर्य करीत होते तोंच दूर कुठेंतरी खटाऱ्याच्या चाकांचा आवाज झाला. विडीची राख झाडीत पाटलांनीं एकवार त्या दिशेकडे पाहिलं. गांवकऱ्यांप्रमाणें गांवकऱ्यांचें बैलही पाटलांच्या पूर्ण परिचयाचे असत. आणि त्यावेळींही बैलांवरूनच त्यांनीं तात्काळ अनुमान काढलें कीं ही कुशाबा जाधवाची गाडी.

कुशाबा ! पाटलांचा अपमान करणारा कुशाबा !

पाटलांना आनंदही झाला आणि वाईटही वाटलें.

तोंच आपलें नांव सार्थ करणारा कुशाबाचा खटारा

हॉटेलच्या दाराशीं दाखल झाला. कुशाबाच्या गाडीचा चालण्याचा वेग अगदींच जेम तेम असल्यानें गांवीं पोंचण्यास आपणाला रात्र होईल याची त्याला पूर्ण कल्पना होती आणि गाडीखालीं उतरून वेळ न दवडतां गाडींत बसल्या-बसल्याच चहाचा एक पेला घेऊन त्यानें गाडी पुढें दामटली.

पाटीलही आपल्या जागेवरून उठले. रस्ता अगदीं अरुंद होता. पाटलानीं कुशाबाला दटावलें, "ए मग्रूर, जरा गाडी बाजूला घे." कुशाबानें गाडी बाजूला घेतली. पाटलांनीं आपली गाडी पुढें काढली. या वेळीं सर्वत्र काळोख पडूं लागला होता, पण वाट पायांखालची असल्यानें काळोखाचें फारसें भय कुणालाच वाटत नव्हतें.

नदीची चढण आपले बैल किती लीलेनें चढून जातात हें कुशाबाला दाखवून देण्याची पाटलांना लहर आली. आणि गाडी नदीच्या पात्रांत उतरतांच त्यांनीं इशाऱ्यादाखल आपल्या बैलाच्या पाठीवर दोन चाबूक ओढले.

गाडी दुसऱ्या तीरास आली. चढण चढूं लागतांच काय झालें कुणास ठाऊक, पाटलांच्या दोन्ही बैलांचे पाय घसरले आणि गाडीसकट पाटील परत पाण्यांत येऊन पडले. त्यांना फारसें लागलें नाहीं पण आपल्या वैऱ्यादेखत आपला असा अपमान झालेला पाहून मात्र त्यांना भारी वाईट वाटलें. कुशाबा गांवीं गेल्यावर ही हकीगत गांवकऱ्यांना सांगितल्या-शिवाय राहणार नाहीं, मोकळी गाडीसुद्धां चढण चढून वर

काढतां आली नाहीं असा आपल्या जनावरांचा बद्लौकिक होणार........

पण जनावरांचे पाय घसरावेत तरी कां ? चटूकन् त्यांच्या डोक्यांत प्रकाश पडला. यापूर्वी अनेक ओल्या अंगाचीं जनावरें, माणसें, गाड्या या रस्त्यानें वर गेलीं असल्यानें पाणी सांडून त्या मातीच्या भुईवर निसरडें झालें आहे आणि जनावरांनीं त्यावर पाय ठेवतांच पाय घसरून जनावरें गाडीसकट खालीं आलीं—

पाटील गाडींतून उतरल. त्यांनीं थोडी वाळलेली माती त्या निसरड्यावर टाकली. आतां गाडी चढायला कांहींच हरकत नाहीं अशी त्यांची खात्री झाल्यावर ते परत गाडींत येऊन बसले आणि त्यांनीं बैल दटावले. पण बैल एक पाऊलही पुढें घेईनात. पाटलांनीं त्यांच्या अंगावर चाबूक फोडले; वाटेल तें केलें. पण त्या चढणीची अशी कांहीं दहशत त्यांना बसली होती देव जाणे--ते एक तसूभरही जागचे हलेनात !

आणि दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, हा सर्व प्रकार कुशाबा मिस्किलपणें हंसत पहात होता. [ काळोखांत त्याचे हास्य पाटलांना दिसलें नाहीं, पण त्या हास्याबद्दल पाटलांनीं आपल्याशीं असा तर्क बांधला होता.]

पाटलांचा नाइलाज झाला. ते कुशाबाकडे मदतीची याचना करण्यास गेले. कुशाबानें आपल्या गाडीचे बैल सोडून त्यांच्या गाडीस जोडले आणि गाडी वर काढून दिली.

त्यानंतर पाटलांनीं गाडीस आपले बैल जोडले. कुशाबानें आपले बैल परत खालीं नेऊन आपल्या गाडीस जुंपून गाडी वर आणली.

दोन्ही गाडया हळूंहळूं मार्ग आक्रमूं लागल्या. पुष्कळ वेळपर्यंत कुणी कांहींच बोलले नाहींत. मग पाटलांनीं विचारलें— " कुशाबा, आमच्या जनावराची आम्ही इतकी निगा राखतो आणि आज असं कां व्हावं बरं ? "

"पाटील, तुम्ही निगा राखता पण तुमच्या जनावरांना कामाचा सराव नाहीं. फुकटचं खाऊन पडलेल्या ऐदी फोफशा माणसागत तुमच्या बैलाच्या नुसत्या इमारती पाहून घ्याव्यात."

कुशाबा बोलला तें रास्त होतें. त्याच्या बोलण्याच्या बुडाशीं कुठलाही वाईट हेतु नव्हता; पण ऐदी फोफशा माणसाचा त्यानें जो उल्लेख केला तो आपल्यालाच उद्देशून, असें पाटलांच्या मनानें घेतलें.

कुशाबानें पाटलांना ऐनवेळीं मदत केली होती. त्यामुळें कुशाबाच्या सच्चेपणाचें प्रत्यंतर येऊन त्याच्याविषयीं जी अढी पाटलांच्या मनांत निष्कारण बसली होती ती मोडून जाऊन दिलसफाई व्हायला कांहींच हरकत नव्हती. पण पाटलांनीं त्याच्या शब्दांचा असा विपर्यास केला तेव्हां पूर्वीची अढी मोडून तर गेली नाहींच; पण उलट जास्तच बळकट झाली

कुशाबानें केलल्या मदतीच्या परतफेडीदाखल दुव्याचा एक

शब्दही न उच्चारतां पाटलांनीं आपले बैल दामटले आणि मैदानांतली वाट असल्यानें ते हां हां म्हणतां कुशाबाच्या नजरेच्या टापूबाहेर गेले. कुशाबा मात्र पाटलांच्या या चमत्कारिक वागणुकीचें आश्चर्य करीत हळूंहळूं आपला मार्ग कापीत होता.

※ ※ ※

गोष्ट संपली. पाटलांच्या या चमत्कारिक वर्तनाबद्दल आपण सर्वजण पाटलांनाच दोष देऊं पण जगांत एकटे पाटीलच या दोषास पात्र आहेत का ? आपल्या रोजच्या वागण्यांत कमअधिक प्रमाणांत आपण सारेचजण या दोषाचे धनी असत नाहीं का ? आपल्या जीवनांतल्या बऱ्याचशा अनर्थांचें मूळ आपल्या दोषातच असतें. हे दोष आपल्याला उमगतील, हे दोष फिरून आपल्या हातून होणार नाहींत अशी आपण काळजी घेऊं तर आपल्या आयुष्यांत घडून येणारे निम्मे–अधिक अनर्थ आपल्याला सहज टाळतां येणार नाहींत का ?

